# ईशोपनिषद्भाष्यार्थ.

( मूळ, अर्थ व भाष्य यांसह. )

संपादक व प्रकाशक.

विष्णु वामन बापट.

( आवृत्ति दुसरी. )



मार्गशीर्ष शुद्ध २ शके १८४३.

पुणे—ता. १ दिसेंबर सन १९२१.

अ
व
ए

# प्रस्तावना.

—:०:—

पहिली आवृत्ति संपल्यामुळें आज ही दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करीत आहों; यांत बरी-च सुधारणा केली आहे व आचार्य-भाष्यावरील रहस्यकारांच्या वगैरे आक्षेपांचें निरसन टीपांत केलें आहे. कागद व छपाई महाग झाल्यामुळें या आवृत्तीची किंमत सहा आणे ठेवावी लागली आहे.

वि. वा. बापट.

---

## पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

वेदवेत्त्या ऋषींचें अखंड ऐश्वर्य व त्यांनीं निष्काम ब्राह्मणांच्या हातीं दिलेला अभंग्य निधि अशा संप्रदायशुद्ध औपनिषद तत्त्वाचें आपाततः तरी ज्ञान मराठी वाचकांस व्हावें म्हणून आम्ही श्रीआचार्यांच्या प्रस्थानत्रय-भाष्याचा सरळ व होईल तितका शब्दशः सुलभ अर्थ विचारी वाचकांच्या सेवेंत क्रमानें समर्पण करण्यास आरंभ करीत आहों[१]. आचार्यांची वाणी मूळ संस्कृत भाषेंतच योग्य गुरूपासून समजून घेऊन निरंतर तिचाच विचार करण्यांत काळ घालविणें, हें महद्भाग्य सर्वांच्याच वांटयास आलेलें नसतें. यास्तव श्रीक्षेत्र वाई येथील परमहंसपरिव्राजक श्रीप्रज्ञानन्दस्वामींच्या कृपा-कटाक्षानें बारा वर्षांपूर्वी प्राप्त झालेलें सांप्रदायिक वेदान्तज्ञान यथाशक्ति स्वदेशबांधवांस वांटून द्यावें, या उद्देशानें गेल्या दहा वर्षांपासून आमचा प्रयत्न विद्यार्थ्यांस वेदान्तग्रंथ शिकविणें व मराठी भाषेंत ग्रंथ लिहणें या दोन मार्गांनीं चालू आहे. मराठीसारख्या अपक्क भाषेंत लिहिलेल्या ग्रंथांपेक्षां साक्षात् संस्कृत भाषेंत असलेले ग्रंथ गुरुमुखानें समजून घेणें जिज्ञासूंस अधिक हितावह व बोधप्रद होतें आणि कोणतेंही खरें शिक्षण तेंच आहे. पण सर्वच ठिकाणीं योग्य गुरू, विशेषतः वेदान्ताचे समर्थ व्याख्याते, आढळत नाहींत. तथापि मनुष्याच्या मनाला समाधान देणारें वेदान्तावांचून दुसरें शास्त्र मात्र नाहीं; आमच्या या म्हणण्याचा प्रत्यय आचार्यादि मान्य ग्रंथकारांच्या विचार-पूर्वक एकदोन ग्रंथांचें अध्ययन केल्यास कोणालाहि येण्यासारखा आहे. यास्तव अशा या हितावह शास्त्राचें रहस्य मराठी भाषेच्या द्वारा महाराष्ट्रीयांपुढें ठेवावें, मग त्यां-तील बहुतेक वाचक जरी कल्पित कादंबऱ्या व कशा तरी लिहिलेलीं नाटकेंच वाचणारे

---

१ हा ग्रंथ व ही प्रस्तावना आम्हीं सिंधमध्यें असतांना व 'ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला' हें मासिक सुरूं करण्यापूर्वी लिहिलेली आहे, एवढेंच वाचकांना सुचवावयाचें आहे.

असतें तरी थोडेंसे तरी विचारी लोक त्याचें परिशीलन करतील, अशी आशा धरू हें काम आम्हीं हातीं घेतलें आहे.

अद्वैतमताचें प्रस्थापन करीत असतांना किंबहुना त्यापूर्वीच श्री-आचार्यांनींहि ग्रंथ लिहिणें व शिष्यांना त्यांचा पाठ सांगणें, हीच प्रणालि सुरू केली. प्रत्यक्ष श्रीशंकराचार्यांच्या तोंडून पद्मपादाचार्यादिकांनी ग्रंथ ऐकले व पुढें त्यांचीच परंपरा सुरू ठेवून स्वसंप्रदायाचा विस्तार केला. अद्वैतवादावर आक्षेप करणारे अनेक वादी आजवर वेळोवेळीं उत्पन्न झालेले असून आचार्यांच्या संप्रदायांतील यतींनीं त्या सर्वांचें सयुक्तिकपणें खंडन केलेलें आहे. त्यामुळेंच रामानुजाचार्यादि सर्व आक्षेपकांशीं टक्कर देऊन आचार्यांचें मत व ग्रंथ अद्यापि जसेच्या तसेच सतेज आहेत आणि त्यांचा जसा जसा अधिक विचार होत जाईल तसें तसें घर्षणानें वाढणाऱ्या हिऱ्याच्या तेजाप्रमाणें त्यांचें उज्ज्वल स्वरूप अधिकच व्यक्त होईल, यांत कांहीं संशय नाहीं. पण अशा त्या उत्तम मताचें प्रतिपादन करणारे ग्रंथ सोप्या व ओजस्वी मराठी भाषेंत आणणें कठिणच जरी नसलें तरी मोठ्या श्रमाचें, दीर्घ कालाचें व खर्चाचेंहि आहे आणि त्यांतूनहि सामान्य मराठी वाचकवर्ग अनात्मविषयांतच आसक्त झालेला असल्यामुळें अध्यात्मविषय ग्रंथांकरितां केलेले श्रम व खर्च यांचें सार्थक होईलच असा विश्वासहि येत नाहीं. तथापि हें शुभ कृत्य आहे. निदान तें अकृत्य तरी नाहीं. त्याअर्थी त्याचा अनिष्ट परिणाम होणें शक्य दिसत नाहीं. शिवाय आचार्यादि मूळ ग्रंथकारांनीं केवळ लोकोपकाराकरितांच श्रम करून हे लोकोत्तर ग्रंथ निर्माण केलेले आहेत. तेव्हां आम्हींहि त्यांचेंच अनुकरण करून असल्या ग्रंथांच्या लेखनानें किंवा प्रकाशनानें श्रीमान होण्याची हांव न धरितां ते केवळ जिज्ञासूंकरितां, आपल्या ब्रह्माभ्यासाकरितां, कालाच्या सदुपयोगाकरितां, विचाररूप उत्तम तपाकरितां व सच्छास्त्राची रुचि लोकांत वाढून त्यामुळें त्यांचें परम हित होण्याकरितांच लिहावे, हेंच उचित आहे. अल्पश्रुत लोकांनी केवळ द्रव्याच्या लालसेनें केलेल्या मनसोक्त व्याख्यानांच्या योगानें संप्रदायशुद्ध सिद्धान्ताचाहि विघात होण्याचा बराच संभव असतो. तो होऊं नये म्हणूनहि आम्हांला देश-कालानुसार होईल तितक्या निरपेक्ष बुद्धीनें आचार्यांच्या सिद्धान्ताचें संरक्षण करणें भाग आहे. ‘ बिभेत्यल्पश्रुताद्वेदः० ’ हे स्मृतिवचन प्रसिद्धच आहे.

वसिष्ठ, शक्ति, पराशर, व्यास, व शुक या परंपरेनें गौडपादाचार्यांस प्राप्त झालेला अद्वैत सिद्धान्त गोविंदभगवत्पूज्यपादांच्या द्वारा श्रीशंकराचार्यांस मिळाला व त्याचें त्यांना वैदिक लोकांत दृढ प्रस्थापन केलें. आचार्यांच्या वेदान्त प्रस्थानत्रयभाष्यांत प्रायः जे युक्तियुक्त सिद्धान्त ठरविलेले आहेत, त्यांचा चांगला विचार करून ते उपस्थित ठेवल्यास त्यांच्या बलावर मनुष्यमात्राच्या शंकांचें निरसन करून प्रत्येकाचें समाधान करतां येणें शक्य आहे आणि पद्मपादाचार्य, सुरेश्वराचार्य, प्रकाशात्ममुनि, वाचस्पतिमिश्र, श्रीशंकरानन्द, विद्यारण्यमुनि, आनंदज्ञान, चित्सुखाचार्य, श्रीमधुसूदनसरस्वती व दुसरेहि मान्य यती यांनीं आपापल्या स्वतंत्र व टीकात्मक ग्रंथांत तेंच केलें आहे.

अद्वैत शास्त्र प्राणिमात्रानें सत्य मानलेल्या जगाला मिथ्या ठरवीत असल्यामुळें त्याच्या वर अनेक जीवांचा मोठा क्रोध आहे. त्यांतून आपणाला विद्वान् व पंडित समजणाऱ्या प्राण्यांना तर त्या सिद्धान्ताचा मोठाच द्वेष वाटत असतो. ते अनेक भ्रामक, पण भ्रान्त जनांना सत्य भासणारे आक्षेप करून अबाधित अद्वैत सिद्धान्ताचें निरसन करण्याचा भगीरथ प्रयत्न आजवर सतत करीत आले आहेत व पुढेंहि करतील ! पण अद्वैत परमार्थ सत्य असल्यामुळें त्याचें निरसन कोणीं आजवर केलें नाहीं व तें पुढें होणें शक्य नाहीं. तथापि विरुद्ध पक्षाचें युक्तिप्रधान भाषण ऐकून स्वतः प्रज्ञ नसलेल्या जनांचा बुद्धिभेद होतो. तो होऊं नये म्हणून अद्वैत संप्रदायांतील लोकांनाहि भेदवाद्यांचें म्हणणें श्रुति व अनुभव यांना संमत झालेल्या युक्तींनींच खोडून काढावें लागतें. त्यामुळेंच वेदान्तशास्त्र कठीण झालें आहे.

वस्तुस्थिति अशी असल्यामुळें पूर्वोक्त आचार्यांचें भाष्य, विवरण, वार्तिक, टीका, दीपिका, चित्सुखी, अद्वैतसिद्धि इत्यादि ग्रंथ, भेदवाद्यांच्या सिद्धान्ताची व भाषाशैलीची चांगलीच ओळख असल्यावांचून लागणें शक्य नसतें. शिवाय ते सर्व ग्रंथ संस्कृतसारख्या अतिशय रम्य, ओजस्वी, मित व प्रौढ भाषेंत लिहिलेले असल्यामुळें सामान्य संस्कृतज्ञ किंवा केवळ मराठी जाणणारे यांच्या अगदीं निरुपयोगी आहेत. पण ते समजणें, यासारखें विवेकी होण्याचें दुसरें साधन मात्र नाहीं. विवेक ही एक अलौकिक दृष्टि आहे. वरील ग्रंथांच्या अध्ययनानें व अध्यापनानें ज्यानें ती संपादन केलेली असते, त्याला या जगांतील कोणत्याहि विद्येंत अथवा कलेंत अनायासानें प्रवेश करितां येणें अगदीं साहजिक आहे.

यास्तव आचार्यांपासून मधुसूदनसरस्वतींपर्यंत वर ज्यांचा निर्देश केला आहे त्यांच्या ग्रंथांचें सार मराठी भाषेंत महाराष्ट्र वाचकांकरितां क्रमानें आणावें, म्हणून ही अद्वैतग्रंथांची माला आम्ही सुरू करीत आहों. तिचा जिज्ञासूंनीं आपापल्या अधिकाराप्रमाणें उपयोग करून घ्यावा. ही माला आमच्या हातून पुरी झाल्यास बरेंच आहे. परंतु वर म्हटल्याप्रमाणें हें काम दीर्घ काल, व्यय व श्रम यांचें असल्यामुळें अर्धीच राहिल्यास ती पुरी करण्याचा भार अर्थात्च वेदान्तशास्त्र शिकणाऱ्या इतर आचार्यभक्तांवर सर्वस्वी रहाणार हें उघड आहे. आमच्या उद्देशाप्रमाणें सर्व घडून आल्यास मराठी भाषा व महाराष्ट्रवाचक या दोघांवरहि त्याचा कांहीं तरी सुपरिणाम झाल्यावांचून रहाणार नाहीं, असा आमचा तर्क आहे. ईश्वराचें आनुकूल्य असल्यास तो खरा ठरेल !

येथवर उद्दिष्ट अद्वैतग्रंथमालेविषयीं केलेला संकल्प व्यक्त केला. आतां त्या मालेंतील प्रथम पुष्प,[१] अशा या ईशोपनिषद्भाष्यार्थाचें सार थोडक्यांत देऊन ही प्रस्तावना संपवितों.—

आचार्यांनीं उपोद्घातभाष्यांत—जेवढे म्हणून वैदिक मंत्र तेवढे सर्व कर्मांच्या उप-

---

१ पुढें निराळयाच क्रमानें ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमाला सुरू झाल्याकारणानें हें त्यांतील नववें रत्न झालें आहे.

योगी, या कर्मठांच्या समजुतीचें थोडक्यांत निरसन करून ईशावास्यादि मंत्र आत्म्याचें यथार्थ स्वरूप प्रतिपादन करणारे, व त्याच्या योगानें संसारधर्मनाशक आत्मैक्यज्ञान उत्पन्न करणारे आहेत,–असें सांगून उपनिषदाच्या व्याख्यानाची प्रतिज्ञा केली आहे. या उपनिषदाच्या पहिल्या मंत्रांत ' सर्व जगत् ईश्वरमय पहावें, सर्व कर्मांचा त्याग करावा व कोणाच्याहि धनाची इच्छा–आकांक्षा करूं नये, ' असें सांगितलें. हे सर्व विधि ज्ञानमार्गाच्या अथवा निवृत्तिमार्गाच्या उपयोगी आहेत. यास्तव या मंत्रांत निवृत्ति-मार्गाचा उपदेश केला आहे, यांत कांहीं संशय नाहीं. दुसऱ्या मंत्रांत कर्मे करीतच जिवंत राहण्याची इच्छा करावी, असें म्हणून कर्मांचें किंवा दुसऱ्या प्रवृत्तिमार्गाचें विधान केलें आहे, त्याविषयींहि कोणाचा मतभेद नाहीं. पण येथें वादाचा असा मुद्दा येतो.–बोधायनप्रभृति वृत्तिकार व त्यांचे रामानुजप्रभृति अनुयायी, हे म्हणतात कीं, पहिल्या मंत्रानें ज्याला ज्ञानाचें विधान केलें आहे त्यालाच या दुसऱ्या मंत्रानें कर्मे करण्याविषयीं सांगितलें आहे. यास्तव या दोन्ही मंत्रांचें तात्पर्य ज्ञान व कर्म यांच्या समुच्चय-अनुष्ठानांत आहे. समुच्चयानुष्ठान म्हणजे एकाच वेळीं दोघांचें अनुष्ठान. पण हे समुच्चयवादी सर्व मंत्र कर्मांच्या उपयोगीच आहेत, असें म्हणणाऱ्या पूर्वमीमांसक कर्मठांहून निराळे व वेदान्त्यांतच अंतर्भूत होणारे आहेत. यास्तव त्यांना एकदेशी म्हणतात.

आचार्यांनीं या उपनिषदाच्या व्याख्यानांत केवल समुच्चय वाद्यांचेंच थोडक्यांत खंडन केलें आहे. ते म्हणतात—ब्रह्मात्मैक्य ज्ञान झालें असतां कर्म होणें शक्यच नाहीं. कारण आत्मज्ञानानें आत्मसंबंधीं अज्ञानाचें निरसन झालें असतां अज्ञानामुळेंच होणारें कर्म संभवत नाहीं. यास्तव मी नित्य शुद्ध-बुद्ध-मुक्तस्वभाव अनंतात्मा आहें. कर्ता, भोक्ता, ब्राह्मणादि जातिमान् इत्यादि नाहीं, असा जोंवर साक्षात्कार होत नाहीं, तोंवर वेदविहित कर्मे करावीं व निषिद्ध कर्मांचा त्याग करावा, हें उचितच आहे. पण पूर्वोक्त साक्षात्कार झाला म्हणजे विधि-निषेधाची चोदना ( प्रेरणा ) करणारा वेदहि त्याला आत्मस्वरूपाहून पृथक् भासत नसल्यामुळें तो कर्मांकडे ढुंकूनहि पहाणार नाहीं, हेंहि उघडच आहे. यास्तव एकमेकांच्या अगदीं विरुद्ध असलेल्या आत्मैक्यज्ञानाचा व कर्मांचा समुच्चय[१] अनुपपन्न आहे.

आचार्यांनीं या आपल्या परम सत्य सिद्धान्ताला नारायणोपनिषदांतील वचन व भगवान् वेदाचार्य व्यासांचें वचन प्रमाण दिलें आहे. तिसऱ्या मंत्रांत अविद्वानांना

---

१ आचार्यांनीं सर्व उपनिषदें, गीता व ब्रह्मसूत्र यांवरील भाष्यांत याप्रमाणें वैदिक कर्म व ज्ञान यांच्या समुच्चयाचें सोपपत्तिक खंडन केलें आहे. तथापि अलीकडे कांहीं लौकिक लोकांनीं कृतकृत्य ज्ञानी जीवन्मुक्तानेंहि लोकसंग्रहार्थ म्ह० जगाचें धारण-पोषण व्हावें, म्हणून ज्ञानोत्तर लौकिक कर्म केलेंच पाहिजे, असा गीतेचा सिद्धान्त ठरविला आहे, पण तो अपसिद्धान्त आहे, हें आम्हीं **गीताभाष्यार्थ** या ग्रंथांत सविस्तर दाखविलें आहे. गी. भा. पृ. ५३-५५, २४५-२४९.

'आत्मघाती' म्हणून व ते अज्ञानावृत असुर्य (देवादि असुरांच्या) लोकांस जातात असें सांगून त्यांची जी निंदा केली आहे ती विचारी मानवांनीं स्वर्गादि लोकांचा अभिलाष सोडून आत्माभिमुख व्हावें म्हणून आहे.

चवथ्या व पांचव्या मंत्रांत-ज्याच्या ज्ञानानें विद्वान् मुक्त होतात तें आत्मतत्त्व कशाप्रकारचें आहे तें सोपाधिक अवस्थेंत उपपन्न होणाऱ्या परस्परविरुद्ध विशेषणांनीं सांगितलें आहे. सर्व आत्ममय आहे, असा ज्याला साक्षात्कार झाला आहे तो कोणाची निंदास्तुति करण्यास प्रवृत्त होत नाहीं व त्या एकत्वदर्शी पुरुषाला शोक व मोह होत नाहीं, असें म्हणून सहाव्या मंत्रांत आत्मज्ञाचें लक्षण व सातव्यांत आत्मज्ञानाचें फल सांगितलें आहे. आठव्या मंत्रांत भाष्यकारांनीं उपोद्घातभाष्यांत ज्याचा निर्देश केला आहे तें आत्म्याचें याथात्म्य वर्णिलें आहे. येथें आत्मज्ञानाचें प्रकरण संपलें. येथून पुढें कर्म व उपासना यांच्या सह अनुष्ठानाचें (समुच्चयाचें) विधान करण्याकरितां दुसरें प्रकरण आरंभिलें आहे. ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा किंवा निवृत्तिमार्ग व प्रवृत्तिमार्ग हे दोनच वेदाचे प्रतिपाद्य अर्थ आहेत. त्यांतील पहिल्या वेदार्थाचा निर्देश या उपनिषदाच्या पहिल्या मंत्रात व दुसऱ्या वेदार्थाचा निर्देश दुसऱ्या मंत्रांत करून पहिल्या निष्ठेचा विस्तार तिसऱ्या मंत्रापासून आठव्या मंत्राच्या अंतापर्यंत केला आहे. नवव्या मंत्रापासून अकराव्या मंत्राच्या अंतापर्यंत—कर्म व उपासना यांच्या पृथक् अनुष्ठानाची निंदा, त्यांतील प्रत्येकाचें पृथक् अवांतर फल व सहानुष्ठानाचें—मृत्यूचें उल्लंघन व अमृतप्राप्ति—हें मुख्य फल; आणि बाराव्या मंत्रापासून चवदाव्या मंत्रापर्यंत अव्याकृत व हिरण्यगर्भसंज्ञक कार्यब्रह्म यांच्या पृथक् उपासनेची निंदा, त्यांतील प्रत्येक उपासनेचें पृथक् फल व सहानुष्ठानाचें वरीलच मुख्य फल सांगितलें आहे. प्रकृतींत लीन होणें, हें कर्म व उपासना यांनीं साध्य होणाऱ्या फलांतील शेवटचें फल आहे. तेथवरच संसाराची गति आहे. त्याच्या पुढें सर्वात्मभाव हें ज्ञाननिष्ठेचें परम फल आहे. याप्रमाणें दोन्ही प्रकारचा वेदार्थ या उपनिषदांत प्रकाशित केला आहे.

११ व्या मंत्रांत अपर ब्रह्माची उपासना व गर्भाधानादि-अंत्येष्टीपर्यंत कर्म, यांचे सह अनुष्ठान करीत जिवंत राहण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाला अमृतत्वप्राप्ति होते, असें म्हटलें आहे. पण ती प्राप्ति कोणत्या मार्गानें होते तें पंधराव्या मंत्रांत सांगितलें आहे. त्या मंत्रांत उपासक अंतकाल समीप आला असतां सत्य आत्म्याच्या उपलब्धीकरितां मार्गाची याचना कशी करितो, तें सांगितलें आहे. अथवा ब्राह्मणांत विनियोग केल्याप्रमाणें त्यानें 'हिरण्मयेन पात्रेण' या मंत्रानें द्वाराची याचना करावी. सोळा, सतरा व शेवटचा अठरा या मंत्रांतहि मरणोन्मुख पुरुषाच्या याचनेचाच प्रकार सांगितला आहे. अर्थात् ९-१८ मंत्रांत वेदाच्या प्रवृत्तिलक्षण धर्माचें प्रतिपादन केलें आहे. भाष्यकारांनीं अठराव्या मंत्राचें व्याख्यान करून झाल्यावर या दुसऱ्या प्रकरणांतील विद्याशब्द व अमृत हें पद, यांचा अर्थ क्रमानें परमात्मसाक्षात्कार व मोक्ष असा न करितां देवताज्ञान (उपासना) व स्वर्गादिकांतील

देवतात्मभाव असाच आपण कां करितों व तसा अर्थ करणेंच कसें युक्त आहे तें थोड्क्यांत सांगितलें आहे. आत्मज्ञान व कर्म यांचें सह अनुष्ठान होणें शक्य आहे, असें समुच्चयवाद्याचें ह्मणणें आहे आणि आत्मज्ञान झाल्यावर अविद्येच्या अस्तित्वाचा संभवच नसल्यामुळें निष्काम आत्मज्ञाच्या हातून वैदिक चोदनाप्राप्त कर्मे घडणें मुळींच शक्य नाहीं, असें सिद्धान्त्यांचें मत आहे. आतां जीवन्मुक्त विद्वानाचें शरीरहि भिक्षेकरितां फिरणें, अन्न खाणें, स्नान, शिष्यांना वेदान्ताचा पाठ सांगणें इत्यादि कर्मे करीत असतें; पण तीं खरीं कर्मे नसून कर्माभास आहे. वृक्षाच्या इच्छेवांचूनहि वाऱ्याच्या वेगामुळें तो जसा हालत असतो, त्याप्रमाणें प्रारब्धवशात् विद्वानाचें शरीरहि यदृच्छेनें चेष्टा करतें. पण तो विवेकी तीं मी करीत आहें, असें समजत नसल्यामुळें तें त्याचें कर्म होत नाहीं. शिवाय येथील विद्याशब्दानें परमात्मविद्याच घेतल्यास तिच्या अमृतस्वरूप फलाच्या प्राप्तीकरितां द्वार व उत्तरमार्ग यांची पंधरापासून पुढील चार मंत्रांनीं जी याचना केली आहे ती उपपन्न होत नाहीं. कारण परमात्मविद्येचें सर्वात्मभाव हें फल येथेंच, या शरीरांत असतांनाच मिळतें. त्यामुळें विद्वान् पुरुषाचे प्राण उत्क्रमण करून ( शरीर सोडून ) जात नाहींत, तर ते शरीरांतच ब्रह्माला मिळतात, असें श्रुतीनें सांगितलें आहे.

असो; या उपनिषदाच्या भाष्यार्थाप्रमाणेंच पुढील सर्व उपनिषदांचा भाष्यार्थ आम्हीं याच पद्धतीनें लिहीत आहों. ईशकृपेनें सर्व उपनिषदांचा भाष्यार्थ संपला म्हणजे आचार्यांचें इतर ग्रंथ आम्ही हातीं घेऊं. या व या पुढील सर्व भाष्यार्थांत कंसामध्यें व टीपांमध्यें लिहिलेला मजकूर प्रायः श्री–आनंदज्ञानांच्या टीकेच्या अनुसार आहे, असें जाणावें. प्रस्तावनेंतील सार मात्र वाचकांचा मूळ ग्रंथांत अनायासानें प्रवेश व्हावा, म्हणून आम्हीं आमच्या अल्पबुद्धीप्रमाणें लिहिलें आहे. वाचकांनीं त्याचा सप्रेम स्वीकार करावा.

हैदराबाद सिंध
मिति श्रावण शु. ७
मंगळवार शके १८३४ } **आचार्यभक्त–विष्णु वामन बापट.**

---

१ ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमालेंत प्रत्येक उपनिषदावरील **आचार्य, शंकरानन्द** व **विद्यारण्य** या तिघांचीं व्याख्यानें क्रमानें येतात, हें त्या मालेच्या ग्राहकांस माहीतच आहे.

# ईशोपनिषद्भाष्यार्थ.

## मूळ, अर्थ व भाष्य यांसह

### उपोद्घातभाष्य.

ॐतत्सद्ब्रह्मणे नमः ।

ईशा वास्यमित्यादयो मन्त्राः कर्मस्वविनियुक्ताः । तेषामकर्मशेषस्यात्मनो याथात्म्यप्रकाशकत्वात् । याथात्म्यं चात्मनः शुद्धत्वापापविद्धत्वैकत्वनित्यत्वाशरीरत्वसर्वगतत्वादि वक्ष्यमाणम् । तच्च कर्मणा विरुध्येतेति युक्त एवैषां कर्मस्वविनियोगः ॥

**भाष्यार्थ**—( वैदिक कर्मावरच अतिशय श्रद्धा ठेवणारे कांहीं कर्मठ जेवढे म्हणून मंत्र आहेत तेवढे ते सर्व कर्मांच्या उपयोगी, असें मानून ईशावास्योपनिषदाचे मंत्रहि कर्मशेष आहेत, असें समजतात. पण त्यांचें तें समजणें बरोबर नसल्यामुळें भाष्यकार ह्मणतात.–) ईशावास्यमित्यादि वाजसनेय संहितोपनिषदाचे मंत्र कर्मांमध्यें विनियुक्त नाहींत. ( कल्पसूत्रांत किंवा ब्राह्मणांत कर्मकांडांतील प्रत्येक मंत्राचा विनियोग सांगितलेला असतो. जसें–' आपो हि ष्ठा मयो भुवः ' या मंत्रांचा मार्जनांत, प्रणवाचा प्राणायामांत, गायत्रीमंत्राचा जपांत विनियोग केलेला आहे. अथवा ' इषे त्वा० ' या मंत्रानें शाखा तोडतो, असें ह्मणून त्या मंत्राचा शाखाच्छेदांत विनियोग केला आहे. तसा या मंत्रांचा विनियोग कर्मांकडे केलेला नाहीं. शिवाय हें कर्मकांडाहून भिन्न प्रकरण आहे. पण मंत्रांतील अर्थावरूनहि मंत्राचा विनियोग कळतो. जसें—' बर्हिर्देवसदनं दामि ' ह्मणजे देवांचें घर अशा दर्भाला मी कापतों, या मंत्रांतील अर्थावरून त्या मंत्राचा विनियोग दर्भच्छेदनाकडे आहे, असें कळतें, त्याप्रमाणें या मंत्रांतहि कर्मशेष आत्म्याचें प्रकाशन करण्याचें सामर्थ्य असल्यामुळें यांचाहि कर्मांकडे विनियोग आहे, अशी शंका घेऊं नये. ) कारण ते मंत्र कर्माचा शेष न होणाऱ्या आत्म्याचें याथात्म्य –स्वाभाविक स्वरूप प्रकाशित करणारे आहेत. ( आत्म्याचें याथात्म्य केवळ कर्मांच्या उपयोगी नाहीं इतकेंच नव्हे तर कर्मांच्या विरुद्धहि आहे, असें आतां भाष्यकार सांगतात–) व आत्म्याचें तें–शुद्धत्व, अपापविद्धत्व [ निष्पापत्व ], एकत्व, नित्यत्व, अशरीरत्व, सर्वगतत्व इत्यादि प्रकारचें–याथात्म्य पुढें ( ८ व्या मंत्रांत ) सांगितलें

आहे. तें तर कर्माशीं विरोध करणारें आहे. यास्तव या मंत्रांचा कर्मामध्यें विनियोग नसणें युक्तच आहे. ( मी स्वभावतः शुद्ध आहें, आगंतुक पापानेंहि पापयुक्त झालेलों नाहीं, मी सर्वत्र एक, अशरीर, आकाशतुल्य आहें, असें जाणणारा कर्माकडे ढुंकूनहि पाहणार नाहीं. फार काय पण आत्म्याचें अशा प्रकारचें आपातज्ञान[१] जरी झालें तरी तें कर्मप्रवृत्तीला निरोध करितें.)

**न ह्येवंलक्षणमात्मनो याथात्म्यमुत्पाद्यं विकार्यमाप्यं संस्कार्यं कर्तृभोक्तृरूपं वा येन कर्मशेषता स्यात् । सर्वासामुपनिषदामात्मयाथात्म्यनिरूपणेनैवोपक्षयात् । गीतानां मोक्षधर्माणां चैवंपरत्वात् । तस्मादात्मनोऽनेकत्वकर्तृत्वभोक्तृत्वादि चाशुद्धत्वपापविद्धत्वादि चोपादाय लोकबुद्धिसिद्धङ्कर्माणि विहितानि ॥**

**भाष्यार्थ**—( शिवाय कर्माचा शेष पुरोडाशादिकांप्रमाणें उत्पाद्य, सोमादिकांप्रमाणें विकार्य, मन्त्रादिकांप्रमाणें आप्य किंवा व्रीहिप्रभृति पदार्थांप्रमाणें संस्कार्य असतो. पण ) आत्म्याचें अशा प्रकारचें याथात्म्य उत्पाद्य–उत्पन्न करण्यास योग्य, विकार्य–विकारास योग्य, आप्य–बलवान् करण्यास योग्य अथवा प्राप्त करण्यास योग्य व संस्कार्य–संस्कारास योग्य नाहीं. त्याचप्रमाणें तें कर्तृरूप अथवा भोक्तृरूपहि नाहीं; कीं ज्यामुळें तें कर्मशेष होईल ! [ तें कर्तृ-भोक्तृरूप नसल्यामुळें ‘ माझ्या इष्ट फलप्राप्तीचें हें साधन आहे, यास्तव मला तें अवश्य केलें पाहिजे, अशा अहंकारपूर्वकहि त्याचा कर्माशीं संबंध पोंचत नाहीं, असा याचा भावार्थ. ] सर्व उपनिषदांची आत्म्याच्या याथात्म्यनिरूपणानेंच परिसमाप्ति झाली आहे. [ सर्व उपनिषदांचें तात्पर्य ऐकात्म्यामध्यें आहे, असें उपक्रमोपसंहारांची एकरूपता, अभ्यास, अपूर्वता, फलवत्त्व, अर्थवाद व युक्ति या सहा तात्पर्यबोधक लिंगांवरून कळतें. यास्तव तीं जपाच्या उपयोगीं आहेत, असें ह्मणणें अगदीं अयुक्त आहे. ] सर्व गीता व मोक्षधर्मेहि आत्म्याचें ऐकात्म्यच प्रतिपादितात. [ म्हणजे उपनिषदांच्या अर्थामध्यें गीतादिकांचाहि संवाद होतो. यास्तव दुसऱ्या इंद्रियांनीं अवगत न होणारेंहि रूप चक्षुरिंद्रियानें अवगत होत असल्यामुळें, तें नाहीं, असें जसें म्हणतां येत नाहीं त्याप्रमाणेंच दुसऱ्या प्रमाणांनीं ज्ञात न होणारेंहि ऐकात्म्य उपनिषद्रूप शब्दप्रमाणावरून ज्ञात होत असल्यामुळें त्याचा अपलाप करितां येत नाहीं. पण आत्मतत्त्व अशा प्रकारचें असल्यास कर्मकांडाचा कोणी अधिकारीच रहात नाहीं व त्यामुळें तें उच्छिन्न होणार, अशी भीति बाळगण्याचेंहि कारण नाहीं, असें आतां सांगतात–] तस्मात् सामान्य लोकांच्या समजुतीनें सिद्ध असलेलें आत्म्याचें अनेकत्व, कर्तृत्व, भोक्तृत्व, अशुद्धत्व, पापविद्धत्व इत्यादिकांचें ग्रहण करूनच [ म्हणजे त्यांचा अपवाद न करितांच पुरुषाची बुद्धि शुद्ध व्हावी, म्हणून ] कर्माचें विधान केलें आहे. [ पण ज्याला उपनिषदांत सांगितलेलें आत्म्याचें याथात्म्य साक्षात् कळलें आहे त्याच्या दृष्टीनें कर्मकांडाचें अप्रामाण्य इष्टच आहे. म्हणजे कोणत्याहि प्राण्याची हिंसा करूं नये,

---

१ सामान्य ज्ञान, शब्दजन्य परोक्ष ज्ञान.

या निषेध शास्त्राच्या अर्थाविषयीं ज्यांचा निश्चय झाला आहे त्याला श्येनयागादि अभिचारकर्मे अप्रमाण वाटलीं तर तें जसें इष्टच आहे, तसेंच हें समजावें. परंतु ज्यांचें चित्त क्रोधादिकांनीं आक्रांत झालें आहे त्याला श्येनादि हिंसाविधींचेंहि जसें प्रामाण्य वाटतें तसेंच मिथ्यात्मदर्शी अज्ञालाहि कर्मकांड प्रमाण वाटणें साहाजिकच आहे.]

**यो हि कर्मफलेनार्थी दृष्टेन ब्रह्मवर्चसादिनाऽदृष्टेन स्वर्गादिना च द्विजातिरहं न काणकुब्जत्वाद्यनधिकारप्रयोजकधर्मवानित्यात्मानं मन्यते सोऽधिक्रियते कर्मस्विति ह्यधिकारविदो वदन्ति ॥**

**भाष्यार्थ**—(याविषयीं जैमिनिप्रभृति मुनींचीहि संमति आहे, असें आतां सांगतात–) जो कोणी पुरुष ब्रह्मवर्चसादि दृष्ट किंवा स्वर्गादि अदृष्ट कर्मफलाचा इच्छा करणारा असतो, मी द्विज आहें व काणा, कुबडा इत्यादि अनधिकारास कारण होणाऱ्या धर्मांनीं युक्त नाहीं, असें आपणास समजत असतो तोच कर्मांचा अधिकारी आहे, त्याचाच कर्मांमध्यें अधिकार आहे, असें अधिकारज्ञ सांगतात. [फलाची इच्छा असणें हें अर्थित्व होय. त्या व वर्णाश्रमाभिमानादि दुसऱ्याहि अधिकार कारणांनीं युक्त असलेल्या पुरुषाचाच कर्मांमध्यें अधिकार आहे, असें पूर्वमीमांसेच्या सहाव्या अध्यायांत प्रस्थापित केलें आहे. पण अर्थित्वाचें कारण मिथ्याज्ञान आहे. कारण आकाशाप्रमाणें निष्क्रिय, स्वभावतःच दुःखांशीं संसर्ग न पावणारा व परमानंदरूप अशा आत्म्याचे ठिकाणीं ‘मला सुखच व्हावें, दुःख होऊं नये,’ असें अर्थित्व, आणि ‘शरीरेंद्रियसामर्थ्यानें मी समर्थ आहें,’ असें अभिमानित्व, मिथ्याज्ञानावांचून संभवत नाहीं.]

**तस्मादेते मन्त्रा आत्मनो याथात्म्यप्रकाशनेनात्मविषयं स्वाभाविकमज्ञानं निवर्तयन्तः शोकमोहादिसंसारधर्मविच्छित्तिसाधनमात्मैकत्वादिविज्ञानमुत्पादयन्ति । इत्येवमुक्ताधिकार्यभिधेयसम्बन्धप्रयोजनान्मन्त्रान्सङ्क्षेपतो व्याख्यास्यामः ॥**

**भाष्यार्थ**—(सारांश ज्याअर्थी या उपनिषदांतील मंत्र आत्म्याचें याथात्म्य प्रकट करणारे आहेत व कर्मविधिशेष अथवा दुसऱ्या प्रमाणांशीं विरुद्ध नाहींत त्याअर्थी ते सप्रयोजन आहेत, यांत शंका नाहीं, असें आतां सांगतात–) तस्मात् आत्म्याचें याथात्म्यप्रकाशन करून त्याच्यायोगानें आत्मविषयक स्वाभाविक अज्ञानाचें निवर्तन करणारे हे मंत्र शोक-मोहादि संसारधर्मांच्या विच्छित्तीचें–निवृत्तीचें साधन, अशा आत्मैकत्वादि[1] विज्ञानास उत्पन्न करितात. यास्तव शास्त्रोक्त मुमुक्षु हा अधिकारी, आत्मैक्य हा विषय, आत्मैक्य व ग्रंथ यांचा प्रतिपाद्य-प्रतिपादकभाव हा संबंध व अज्ञानाच्या निवृत्तिपूर्वक परमानंदप्राप्ति हें फल, यांनीं युक्त असलेल्या या मंत्रांचें आम्ही संक्षेपतः व्याख्यान करितों.

---

१ आत्मा सर्व भूतांत एक आहे, तो नित्य, शुद्ध, ज्ञानस्वभाव व मुक्त आहे इत्यादि विज्ञानास.

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥

॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

**शांतीचा अर्थ**—तें परब्रह्म पूर्ण म्हणजे व्यापक आहे. हें सोपाधिक ब्रह्महि स्वरूपानें पूर्ण आहे. तें हें कार्यात्मक ब्रह्म पूर्ण म्हणजे कारणात्मक ब्रह्मापासून उद्भवतें. पण तें त्याच्यापासून जरी निराळें होत असलें तरी, आपलें पूर्णत्व सोडीत नाहीं. तर तें पूर्णच उद्भवतें. कार्यरूप ब्रह्माचें पूर्णत्व घेऊन पूर्णच—केवल ब्रह्म—अवशिष्ट राहतें. [ म्हणजे सृष्टीच्या पूर्वी जे अखंड एकरस सर्वव्यापी ब्रह्म होतें तेंच हें सृष्टीनंतरचें नामरूपोपाधियुक्त कार्यब्रह्म आहे. पण तेंहि पूर्ण आहे. त्या कारणरूप पूर्णापासून हें कार्यरूप ब्रह्म पृथक् आहे, असें भासूं लागतें. प्रलयसमयीं त्या द्वैतरूप कार्यब्रह्मांतील पूर्णत्व तेवढें घेऊन म्हणजे पूर्णत्व हा आपला धर्म त्यांतून काढून घेऊन तें पहिलें कारणरूप ब्रह्मच अवशिष्ट राहतें.]

हरिः ॐ । ईशा वास्यमिदꣳ सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यस्विद्धनम् ॥ १ ॥

**मन्त्रार्थ—जगत्यां यत्किंच जगत् ( तत् ) इदं ईशा वास्यं**—या पृथ्वींत जें कांहीं जगत् आहे तें हें सर्व ईश्वरानें आच्छादित करावें. (परमार्थ सत्यरूपानें हें सर्व चराचर झांकून टाकावें. सर्वविकारजात आत्मरूप आहे, अशी भावना करावी. तशी भावना केली असतां हें सर्व सोडल्यासारखें होतें,)—**तेन त्यक्तेन भुञ्जीथाः**—त्या त्यागानें तूं आपलें पालन कर. (आणि ज्यानें अशा रीतीनें त्याग केला आहे असा)—**कस्यस्विद् धनं मा गृधः**—तूं कोणाच्याहि धनाची आकांक्षा करूं नको. १

**ईशा वास्यमित्यादि । ईशा ईष्ट इतीट् तेनेशा । ईशिता परमेश्वरः परमात्मा सर्वस्य । स हि सर्वमीष्टे सर्वजन्तूनामात्मा सन्प्रत्यगात्मतया तेन स्वेन रूपेणात्मनेशा वास्यमाच्छादनीयम् ॥**

**भाष्यार्थ**—‘ ईशावास्यं० ’ इत्यादि मंत्राचें व्याख्यान—जो ईशन करतो तो ईट्. या ईट्-शब्दाचें तृतीया एकवचन ‘ ईशा ’ म्हणजे ईश्वरानें. परमेश्वर परमात्मा सर्वांचा ईशिता आहे. [ परमात्मा जरी अविक्रिय आहे तरी माया-उपाधीमुळें त्याच्या ठिकाणीं काल्पनिक कर्तृत्व संभवतें. ईश्वर या शब्दाचा वाच्य[1] अर्थ शबल ब्रह्म व लक्ष्य अर्थ निरुपाधिक ब्रह्म आहे. पण असें म्हटल्यास एक ईशिता व दुसरें सर्व त्याचें ईशितव्य, असा भेद प्राप्त होतो, अशी शंका कोणी घेऊं नये, म्हणून आचार्य म्हण-

---

१ वाच्य म्हणजे शब्द उच्चारतांच ध्यानांत येणारा अर्थ, प्रसिद्ध अर्थ; व लक्ष्य म्हणजे वाच्यार्थाला असंभव झाल्यामुळें विचारानें ध्यानांत येणारा अर्थ, लक्षणेनें कळणारा अर्थ.

तात-] सर्व जंतूंचा आत्मा होऊन प्रत्यगात्मरूपानें-अंतर्यामिरूपानें तो सर्वांचें ईशन करतो. त्या स्वरूपभूत आत्म्यानें, ईशानें हें सर्व आच्छादित करावें.

**किम् । इदं सर्वं यत्किञ्च यत्किञ्चिज्जगत्यां पृथिव्यां जगत्तत्सर्वं स्वेनात्मना ईशेन प्रत्यगात्मतयाहमेवेदं सर्वमिति परमार्थसत्यरूपेणानृतमिदं सर्वं चराचरमाच्छादनीयं स्वेन परमात्मना ॥**

**भाष्यार्थ**—हें सर्व म्हणजे काय तें सांगतों-पृथ्वीमध्यें हें जें कांहीं उत्पन्न होऊन विनाश पावणारें आहे तें सर्व स्वरूपभूत आत्मसंज्ञक ईश्वरानें ( आच्छादित करावें. ) प्रत्यगात्मरूपानें मीच हें सर्व आहें, असे जाणून आपल्या परमात्मरूप परमार्थ सत्य स्वरूपानें हें सर्व असत्य चराचर आच्छादित करावें. [ ज्याप्रमाणें एखादा पुरुष आरसे, निरनिराळ्या पात्रांतील पाणी इत्यादि उपाधिमुळें उद्भवलेल्या प्रतिबिंबांचा आत्मा असून बिंबभूत ईशिताहि होतो, त्याप्रमाणें औपाधिक भेदामुळें एकच आत्मा ईशिता व ईशितव्य या रूपानें भासतो. त्यामुळें तो भासणारा भेद सत्य आहे, असें अनुमान संभवत नाहीं. आपण आजवर भ्रांतीनें जें हें सर्व दृश्य अनीश्वररूप, अनात्मरूप, जड आहे इत्यादि समजत होतों तें वस्तुतः ईश्वरच आहे, आत्माच आहे, अशा ज्ञानानें जगाला आच्छादितच करावें. मी सर्वात्मक ईश्वर आहें, असें जाणावें, हा येथील तत्त्वोपदेश आहे. ]

**यथा चन्दनागर्वादेरुदकादिसम्बन्धजक्लेदादिजमौपाधिकं दौर्गन्ध्यं तत्स्वरूपनिघर्षणेनाच्छाद्यते स्वेन पारमार्थिकेन गन्धेन । तद्वदेव हि स्वात्मन्यध्यस्तं स्वाभाविकं कर्तृत्वभोक्तृत्वादिलक्षणं जगद्द्वैतरूपं जगत्यां पृथिव्यां जगत्यामित्युपलक्षणार्थत्वा. त्सर्वमेव नामरूपकर्माख्यं विकारजातं परमार्थसत्यात्मभावनया त्यक्तं स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—(पण नुसत्या एवढ्या उपदेशानेंच आत्मसाक्षात्कार होऊन ज्याची मिथ्या दृष्टि बाधित होत नाहीं त्यानें विचारादि प्रयत्नानें तत्त्वप्रकाश संपादन करावा, म्हणजे मिथ्यादृष्टीचा बाध होईल, असा अभिप्राय मनांत धरून आचार्य दृष्टान्त देतात-) ज्याप्रमाणें चंदनाचें खोड, अगरूचा खडा, इत्यादिकांचा पाण्याशीं संबंध होऊन तीं कुजल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेलें दौर्गंध्य [ दुर्गंधता ] त्यांच्या स्वरूपाचें [ खोडाचें किंवा खड्याचें ] घर्षण केल्यानें त्यांच्या स्वाभाविक पारमार्थिक गंधानें आच्छादित होतें, त्याप्रमाणेंच आत्म्याच्या ठिकाणीं अध्यस्त-आरोपिलेलें स्वाभाविक कर्तृत्वभोक्तृत्वादि लक्षण द्वैतरूप जगत्-'जगत्यां'ह्म० पृथ्वीमध्यें 'जगत्यां' हा शब्द उपलक्षणार्थ असल्यामुळें सर्वच नामरूपकर्मात्मक विकारजात,परमार्थ सत्य आत्म्याच्या भावनेनें त्यक्त होतें. [ चंदनाचें खोड वगैरे पाण्यानें कुजल्यास त्याला दुर्गंध येऊं लागतो. पण तेंच त्याला घांसून कुजलेला भाग काढून टाकल्यास त्याच्या स्वाभाविक सुगंधानें औपाधिक दुर्गंध आच्छादित होतो, त्याचप्रमाणें हें अविद्याकार्य बाधयोग्य आहे. विचारादि प्रयत्न करणाऱ्या पुरुषाच्या मिथ्या दृष्टीचा तिरस्कार होणें संभवनीय आहे. असो; जो पुरुष

युक्तिकुशल असतो त्याला विचार करण्याचा अधिकार असतो आणि जो युक्तिशून्य असतो त्याचा हें सर्व दृश्य व मी ईश्वरच आहें, या भावनेमध्यें अधिकार असतो. पण त्या दोन्ही प्रकारच्या अधिकाऱ्यांचा सर्व कर्मांच्या संन्यासामध्येंच अधिकार आहे, हें या मंत्राला सांगावयाचें आहे. यास्तव येथें त्यक्त म्हणजे सर्व कर्मांचा संन्यास, असेंच समजावें. कारण पुढच्या वाक्यानें त्या त्यक्तानें [ त्यागानें ] आत्मरक्षण करा, असें सांगावयाचें आहे. ]

**एवमीश्वरात्मभावनया युक्तस्य पुत्राद्येषणात्रयसंन्यास एवाधिकारो न कर्मसु । तेन त्यक्तेन त्यागेनेत्यर्थः । न हि त्यक्तो मृतः पुत्रो वा भृत्यो वात्मसम्बन्धिताया अभावादात्मानं पालयत्यतस्त्यागेनेत्ययमेव वेदार्थः । भुञ्जीथाः पालयेथाः ॥**

**भाष्यार्थ**—(इतरत्रहि त्यागाची अशीच स्तुति केलेली आहे आणि पुत्र,वित्त व लोक यांच्या एषणा चित्तविक्षेपास कारण होणाऱ्या आहेत, हेंहि प्रसिद्धआहे,अशा अभिप्रायानें भाष्यकार म्हणतात–) याप्रमाणें ईश्वरच माझा व या सर्व चराचराचा आत्मा आहे, अशा ईश्वरात्मभावनेनें युक्त असलेल्या पुरुषाचा पुत्रादि तीन एषणांच्या त्यागामध्येंच अधिकार आहे. कर्मामध्यें नाहीं. असो; त्या त्यक्तानें म्हणजे त्यागानें, असा याचा अर्थ समजावा.कारण त्यक्त ह्मणजे मृत पुत्र किंवा सेवक आत्मसंबंधित्वाचा अभाव असल्यामुळें [ म्हणजे त्या मेलेल्या पुत्रादिकांचा आत्म्याशीं कांहीं संबंध उरत नसल्यामुळें ] आत्म रक्षण करीत नाहीं. यास्तव त्यागानें याचा ‘ सर्व कर्मसंन्यासानें ’ असाच अर्थ करावा. असो; त्यागानें तूं आत्म्याचें रक्षण कर. [ त्याग निष्क्रिय आत्मस्वरूपाला अनुकूल असल्यामुळें त्याच्यायोगानें आत्मा रक्षित होईल. ]

**एवं त्यक्तैषणस्त्वं मा गृधः गृधिमाकाङ्क्षां मा कार्षीर्धनविषयाम् । कस्यस्विद्धनं कस्यचित्परस्य स्वस्य वा धनं मा काङ्क्षीरित्यर्थः । स्विदित्यनर्थको निपातः । अथवा मा गृधः । कस्मात् । कस्यस्विद्धनमित्याक्षेपार्थो न कस्यचिद्धनमस्ति यद्गृध्येत आत्मैवेदं सर्वमितीश्वरभावनया सर्वं त्यक्तमत आत्मन एवेदं सर्वमात्मैव च सर्वमतो मिथ्याविषयां गृधिं मा कार्षीरित्यर्थः ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—( शरीररक्षणाच्या अत्यंत उपयोगीं असलेल्या कौपीन [ लंगोटी ], आच्छादन, भिक्षाशन इत्यादिकांस सोडून दुसऱ्याहि द्रव्यपरिग्रहाविषयीं कदाचित् इच्छा झाल्यास संन्याशानें तिचा निरोध करण्याचा यत्न करावा. कारण ती इच्छा आत्मस्वरूपानें राहणें या प्रधानाच्या विरुद्ध आहे, असा अभिप्राय धरून श्रुति संन्यासाला एक नियम विधि सांगत आहे— ) याप्रमाणें ज्यानें एषणांचा त्याग केला आहे असा तूं धनविषयक आकांक्षा करूं नको. आपल्या किंवा दुसऱ्या कोणाच्या धनाची इच्छा करूं नकोस, असा याचा भावार्थ.मूळ श्रुतिवचनांत ‘कस्यस्विद् धनं’ अशीं पदें आहेत. त्यांतील ‘स्विद्’ हें अव्यय अर्थशून्य आहे, त्याचा कांहीं अर्थ नाहीं, असें समजावें. किंवा त्या सर्व वाक्याचा असा अर्थ करावा–आकांक्षा करूं नको, कारण धन कोणाचें बरें आहे? कोणाचेंहि

नाहीं, कीं ज्याची इच्छा केली जाईल. म्हणजे या दुसऱ्यापक्षीं 'स्विद्' हें अव्यय आक्षेप या अर्थी आहे, असें होतें. हें सर्व आत्माच आहे, अशा ईश्वरभावनेनें सर्व सोडलें. त्यामुळें आत्म्याचेंच सर्व व आत्माच हें सर्व असें झालें. यास्तव मिथ्या पदार्थांची इच्छा करूं नकोस, हा याचा इत्यर्थ. ( व्यवहारदृष्ट्याहि सर्व जड चित्परतंत्र असल्यामुळें हें सर्व आत्म्याचें उपकारक आहे, असें ठरतें. यास्तव अप्राप्त विषयाविषयीं आकांक्षा करूं नये. पण परामार्थतः सर्व आत्माच, तेव्हां पारमार्थिक दृष्टया आकांक्षेला मुळीं विषयच नाहीं, असा याचा इत्यर्थ. ) १.

**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतꣳ समाः ।**
**एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥ २ ॥**

**मन्त्रार्थ—इह कर्माणि कुर्वन् एव शतं समाः जिजीविषेत्**—या लोकीं अग्निहोत्रादि कर्मे करीतच शंभर वर्षे जिवंत राहण्याची इच्छा करावी.—**एवं त्वयि नरे इतः अन्यथा न अस्ति ( येन ) कर्म न लिप्यते**—अशा रीतीनें जीवंत राहण्याची इच्छा करणाऱ्या व केवल मी नर आहें, एवढाच अभिमान धरणाऱ्या तुझ्याविषयीं कर्मे करणें या प्रकाराहून दुसरा प्रकारच नाहीं; कीं ज्याच्यायोगानें अशुभ कर्मानें लिप्त होणार नाहींस.( अशुभ कर्मांचा लेप लागणार नाहीं. ) २.

**एवमात्मविदः पुत्राद्येषणात्रयसंन्यासेनात्मज्ञाननिष्ठतयात्मा रक्षितव्य इत्येष वेदार्थः । अथेतरस्यानात्मज्ञतयात्मग्रहणायाशक्तस्येदमुपदिशति मन्त्रः । कुर्वन्नेवेति । कुर्वन्नेव इह निर्वर्तयन्नेव कर्माण्यग्निहोत्रादीनि जिजीविषेज्जीवितुमिच्छेच्छतं शतसङ्ख्याकाः समाः संवत्सरान् । तावद्धि पुरुषस्य परमायुर्निरूपितम् । तथा च प्राप्तानुवादेन यज्जिजीविषेच्छतं वर्षाणि तत्कुर्वन्नेव कर्माणीत्येतद्विधीयते ॥**

**भाष्यार्थ**—( पहिल्या मंत्राच्या पूर्वार्धानें तत्त्वाचा उपदेश केला. तिसऱ्या पादानें ज्याचें ज्ञान परिपक्व झालेलें नाहीं त्याच्याकरितां संन्यासाचें विधान केलें व चवथ्या पादानें संन्यासाचा नियम सांगितला. आतां भाष्यकार त्या पहिल्या व दुसऱ्या मंत्राचा संबंध सांगण्याकरितां पूर्व मंत्रार्थाचा संक्षेपतः अनुवाद करितात— ) याप्रमाणें आत्मवेत्त्यानें पुत्रादि एषणात्रयाचा त्याग करून व आत्मज्ञाननिष्ठ होऊन आत्म्याचें रक्षण करावें; असा हा पूर्व मंत्राचा अर्थ झाला. आतां 'कुर्वन्नेव०' हा दुसरा मंत्र अनात्मज्ञतेमुळें आत्मग्रहण करण्यास असमर्थ असलेल्या दुसऱ्या अनात्मज्ञ पुरुषास असा उपदेश करीत आहे.—या लोकीं अग्निहोत्रादि कर्मे करीतच शंभर वर्षे जिवंत राहण्याची इच्छा करावी. पुरुषाचें परम आयुष्य तितकेंच सांगितलें आहे. यास्तव त्या प्राप्त आयुष्याचा अनुवाद करून, शंभर वर्षे जिवंत राहण्याची इच्छा जर करावयाची असेल तर ती कर्मे करीतच जिवंत राहण्याची करावी. असें येथें विधान केलें जात आहे.

**एवमेवम्प्रकारेण त्वयि जिजीविषति नरे नरमात्राभिमानिनीत एतस्मादग्निहोत्रादीनि कर्माणि कुर्वतो वर्तमानात्प्रकारादन्यथा प्रकारान्तरं नास्ति येन प्रकारेणाशुभं**

**कर्म न लिप्यते कर्मणा न लिप्यत इत्यर्थः । अतः शास्त्रविहितानि कर्माण्यग्निहोत्रादीनि कुर्वन्नेव जिजीविषेत् ॥**

**भाष्यार्थ**—अशा रीतीनें जिवंत राहण्याची इच्छा करणाऱ्या व केवल मी नर [ पुरुष-शरीर ] आहें, असा अभिमान धरणाऱ्या तुजकरितां याहून–म्हणजे अग्निहोत्रादि कर्मे करीतच आयुष्य घालविणें या प्रकाराहून–दुसरा प्रकारच नाहीं कीं ज्याच्यायोगानें अशुभ कर्म लिप्त करीत नाहीं; पुरुष अशुभ कर्मानें लिप्त होत नाहीं, असा दुसरा प्रकारच नाहीं, हा याचा इत्यर्थ. यास्तव शास्त्रविहित अग्निहोत्रादि कर्मे करीतच जिवंत राहण्याची इच्छा करावी.

**कथं पुनरिदमवगम्यते । पूर्वेण संन्यासिनो ज्ञाननिष्ठोक्ता द्वितीयेन तदशक्तस्य कर्मनिष्ठेति ॥**

**भाष्यार्थ**—( पूर्व मंत्रांत ज्याला उद्देशून ज्ञानाचें विधान केलें आहे, त्यालाच उद्देशून या पुढच्या मंत्रानें कर्माचें विधान केलें आहे. यास्तव या दोन्ही मंत्रांचें समुच्चयानुष्ठानांत तात्पर्य आहे, अशी वेदान्ताच्या एकदेशीची शंका भाष्यकार उद्भावीत करितात. समुच्चयवादी–) पूर्व मंत्रानें संन्याशाची ज्ञाननिष्ठा सांगितली व या दुसऱ्या मंत्रानें त्या निष्ठेविषयीं असमर्थ असलेल्या पुरुषास उद्देशून कर्मनिष्ठा सांगितलेली आहे, हें कसें बरें कळतें ? [ ऋतुकालीं भार्येशीं गमन करणें व त्रिदंडी संन्यासाचे धर्म पालन करणें, या दोन कर्माचा एकाधिकारामध्यें जसा विरोध आहे, म्हणजे एका गृहस्थाला किंवा संन्याशाला त्या दोन्ही कर्मांचें एकदाच अनुष्ठान करितां येणें जसें शक्य नाहीं त्याप्रमाणें शुद्ध ब्रह्मज्ञान व कर्म यांचाहि एकाधिकारांत विरोध आहे. सिद्धान्त्यांचें हें म्हणणें ऐकून समुच्चयवादी म्हणतो–तरि सुद्धां एका पुरुषाला एकाच वेळीं क्रमानें त्यांचें अनुष्ठान करतां येणें शक्य आहे. सिद्धान्ती—नाहीं. तसेंहि शक्य नाहीं. कारण त्या दोन अनुष्ठानांचें स्वरूप विशिष्ट आहे व अधिकार भिन्न आहे. ऋतुगमन व अष्टविध मैथूनत्यागरूप ब्रह्मचर्य यांचें स्वरूप एकमेकांच्या अगदींच विरुद्ध असल्यामुळें व त्यांतील एक गृहस्थाचा धर्म व दुसरा यतीचा धर्म असल्यामुळें त्यांचें अनुष्ठान एका पुरुषाकडून एकाच वेळीं क्रमानेंहि होणार नाहीं. ‘ कर्म व ज्ञान या दोहोंचेंहि प्रतिपादन वेदानें केलेलें असल्यामुळें तीं दोन्ही शुद्ध आहेत आणि त्या कारणानें त्यांच्यामध्यें मुळीं विरोधच नाहीं, ’ म्हणून तुम्ही म्हणाल तर तेंहि उचित नव्हे. कारण तसें म्हणूं लागल्यास वर सांगितलेल्या दोन धर्मांचाहि विरोध नाहीं, असें अनुचित भाषण केल्यासारखें होईल. वादी—अहोपण, ऋतुगमन व ब्रह्मचर्य हीं दोन्ही एका पुरुषाला उद्देशून सांगितलेलींच नाहींत. सिद्धान्ती—मग ज्ञान व कर्म तरि एका पुरुषाला उद्देशून कोठें सांगितलेलें आहे ? वादी—पण यतीला उद्देशून मैथुनाचा निषेध सांगितलेला असल्यामुळें त्या दोहोंचें सह अनुष्ठान होत नाहीं. सिद्धान्ती—‘ न कर्मणा न प्रजया० ’ नानु-

१ आत्म ज्ञान व श्रौत-स्मार्त कर्म यांचें सह अनुष्ठान करणें, यासच समुच्चयानुष्ठान म्हणतात.

ध्यायाद्बहूञ्शब्दान्॰ ' इत्यादि श्रुतिवाक्यें कर्मांचाहि निषेध करीत आहेत. वादी—केवल कर्मांविषयीं तो आहे. ज्ञानसमुच्चित कर्मांविषयीं नव्हे; सिद्धान्ती—केवल कर्मांचाच तो निषेध आहे, असें प्रत्यक्ष श्रुतिवाक्यावरून ठरत नाहीं. शिवाय ज्ञान व कर्म यांच्या समुच्चयाच्या विधानाचाहि अद्यापि निश्चय झालेला नाहीं. वास्तव या दोन मंत्रांचें तात्पर्य ज्ञान व कर्म यांचें सह अनुष्ठान करणें, या समुच्चयांत नाहीं, असें भाष्यकार सांगतात.–]

**उच्यते । ज्ञानकर्मणोर्विरोधं पर्वतवदकम्प्यं यथोक्तं न स्मरसि किम् । इहाप्युक्तं " यो हि जिजीविषेत् स कर्म कुर्वन् । ईशा वास्यमिदं सर्वं तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यस्विद्धनम् " इति च । न जीविते मरणे वा गृधिं कुर्वीतारण्यमियादिति च पदम् । ततो न पुनरियादिति संन्यासशासनात् । उभयोः फलभेदं च वक्ष्यति ॥**

**भाष्यार्थ**—या शंकेचें उत्तर सांगितलें जातें—ज्ञान व कर्म यांचा विरोध पर्वताप्रमाणें अकम्प्य आहे, असें जें आम्हीं वर सांगितलें आहे तें तुला आठवत नाहीं का ? [ कर्तृत्वादि अध्यासाचा आश्रय करून राहणारें कर्म आत्म्याचें शुद्धत्व, अकर्तृत्व इत्यादिकांचें ज्ञान झालें असतां बाधित होतें, असें आम्हीं उपोद्घातभाष्यांत सांगितलें आहे. पण तें तुला आठवत नाहींसें दिसतें. त्यावांचून ज्ञान व कर्म यांचें एकाधिकारत्व तूं कल्पिलें नसतेंस. मंत्रांतील चिह्नांवरूनहि त्यांचें भिन्नाधिकारत्व म्हणजे कर्माचा अधिकारी निराळा व ज्ञानाचा अधिकारी निराळा, असें प्रतीत होतें, असें आतां सांगतात.— ] या उपनिषदांतहि–जो जिवंत राहण्याची इच्छा करीत असेल त्यानें कर्म करीतच जिवंत रहावें व जो ज्ञानाचा अधिकारी म्हणजे मुक्त होण्याची इच्छा करणारा मुमुक्षु असेल त्यानें ईश्वराच्या योगानें हें सर्व झांकून टाकावें; सर्वकर्मसंन्यासानें आत्मरक्षण करावें. कोणाच्याहि धनाची इच्छा करूं नये–असें सांगितलें आहे. [ धनसंपन्न पुरुषच कर्म करूं शकतो. पण येथें तर पहिल्या मंत्रांत धनाची इच्छाहि न करण्याविषयीं सांगितलें आहे. तस्मात् सर्व ईश्वरमय आहे, असें पाहणारा पुरुष कर्मांचा अधिकारी नव्हे.] जिवंत राहण्याची इच्छाहि कर्मांच्या अधिकाऱ्यालाच होत असते.ज्ञानाधिकाऱ्याला होत नाहीं, याविषयीं प्रमाण देतात—" जीवित किंवा मरण यांचीहि आकांक्षा करूं नये. तर अरण्यांत, स्त्रीजनांनीं न व्यापलेल्या एकान्तप्रधान आश्रमांत जावें, ही वेदशास्त्रांची मर्यादा आहे. त्या अरण्यवासावरून उपलक्षित होणाऱ्या संन्यासापासून कर्मश्रद्धेनें पुनरपि परत गृहस्थादि आश्रमांत येऊं नये, " असें म्हणून एका श्रुतीनें जिजीविषादि-रहित पुरुषाला संन्यासाचें विधान केलें आहे. ज्ञान व कर्म या दोहोंचें फलहि निरनिराळें आहे, असें पुढें हीच श्रुति सांगणार आहे. [ याच उपनिषदाच्या सातव्या मंत्रांत ' आत्म्याचें एकत्व पाहणाराला शोक कशाचा व मोह कशाचा ? ' असें म्हणून कारणासह अनर्थांचा नाश हें ज्ञानफल सांगितलें आहे. तसेंच शेवटच्या आठव्या मंत्रांत संसारमंडलांतीलच दुसऱ्या देशाची प्राप्ति होणें, व तेथें हिरण्यगर्भाच्या पदाचा लाभ

१ जिजीविषा म्हणजे जिवंत राहण्याची इच्छा.

होणें, या स्वरूपाचें कर्मफलहि श्रुति सांगणार आहे. त्यामुळेंहि या दोन प्रकारच्या फलांतील एकाच फलाची इच्छा करणाऱ्या पुरुषाचा ज्ञान व कर्म यांच्या समुच्चयांत अधिकार नाहीं. ]

**इमौ द्वावेव पन्थानावनुनिष्क्रान्ततरौ भवतः क्रियापथश्चैव पुरस्तात्संन्यासश्चोत्तरेण । निवृत्तिमार्गेण एषणात्रयस्य त्यागः । तयोः संन्यासपथ एवातिरेचयति । न्यास एवात्यरेचयदिति च तैत्तिरीयके । "द्वाविमावथ पन्थानौ यत्र वेदाः प्रतिष्ठिताः । प्रवृत्तिलक्षणो धर्मो निवृत्तश्च विभावितः" इत्यादि पुत्राय विचार्य निश्चितं व्यासेन वेदाचार्येण भगवता । विभागञ्चानयोर्दर्शयिष्यामः ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**—( त्यांच्या भिन्न अधिकारित्वाविषयीं नारायणोपनिषद्वाक्यहि प्रमाण आहे, असें आतां सांगतात–) असे दोन प्रकारचे अधिकारी असल्यामुळें हे दोनच मार्ग सृष्टिकालीं–भूतसृष्टीच्या मागोमाग प्रवृत्त झाले आहेत. पूर्वी क्रियामार्ग व मागून संन्यास–निवृत्तिमार्गानें तीन एषणांचा त्याग. त्या दोन मार्गांतील संन्यासच श्रेष्ठ आहे. ( कारण संन्यास व परम पुरुषार्थ यांमध्यें अंतर नसतें ). ' न्यास एवात्यरेचयत् ' असें तैत्तिरीयारण्यकांत सांगितलें आहे. ( व्यासांचें वचनहि याचाच संवाद करणारें आहे, असें आतां भाष्यकार सांगतात.–) वेदाचार्य भगवान् व्यासानेंहि विचार करून आपल्या पुत्राला असें निश्चित मत सांगितलें आहे.—" द्वाविमावथ पन्थानौ यत्र वदाः प्रतिष्ठिताः । प्रवृत्तिलक्षणो धर्मो निवृत्तश्च विभावितः ॥ " **अर्थ**—' ज्यांमध्यें वेद प्रतिष्ठित आहेत [ स्थिर राहिले आहेत ] ते हे दोन पंथ आहेत. एक प्रवृत्तिलक्षण धर्म व दुसरा चांगल्या रीतीनें भावना केलेला निवृत्त धर्म. असो; त्यांचा विभाग आम्ही पुढें दाखवूं. २

## असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसाऽऽवृताः ।
## तांस्ते प्रेत्याभिगच्छन्ति ये के चात्महनो जनाः ॥३॥

**मन्त्रार्थ—ते असुर्याः नाम लोकाः**—ते असूर्य लोक (देवादिकांचे जन्म)—**अन्धेन तमसा आवृताः**—अज्ञानमतानें आच्छादित झालेले आहेत—**ये के च आत्महनः जनाः**—जे कोणी आत्मघाती लोक असतात—**ते प्रेत्य तान् अभिगच्छन्ति**—ते या देहाला सोडून त्या स्थावरान्त देहांना प्राप्त होतात. ३

**अथेदानीमविद्वन्निन्दार्थोऽयं मन्त्र आरभ्यते । असुर्याः परमात्मभावमद्वयमपेक्ष्य देवादयोऽप्यसुरास्तेषाञ्च स्वभूता लोका असुर्या नाम । नामशब्दोऽनर्थको निपातः । ते लोकाः कर्मफलानि लोक्यन्ते दृश्यन्ते भुज्यन्त इति जन्मानि । अन्धेनादर्शनात्मकेनाज्ञानेन तमसाऽऽवृता आच्छादिताः । तान्स्थावरान्तान्प्रेत्य त्यक्त्वेमं देहमभिगच्छन्ति यथाकर्म यथाश्रुतम् ॥**

**भाष्यार्थ**—( पहिल्या मंत्रार्थाचा विस्तार करण्यास्तव ) आतां अगोदर अविद्वानाची निन्दा करण्याकरितां हा तिसरा मंत्र आरंभिला जातो. असुर्या म्हणजे असु-

यांचे. अद्वय परमात्मभावाच्या अपेक्षेनें देवादिकहि असुर होत. त्यांचे स्वभूत [ धनरूप, मालकीचे ] लोक. ' असुर्या नाम ' येथील ' नाम ' हा शब्द अर्थरहित निपात-अव्यय आहे. लोक म्हणजे ज्यांना पाहिलें जातें, भोगलें जातें अशीं कर्मांचीं फळें-जन्म. ते असुर्या लोक अंध-अदर्शनात्मक-तमानें, अज्ञानानें आवृत-आच्छादित झालेले आहेत. त्या ब्रह्मादि-स्थावरान्त लोकांना ते आत्महन पुरुष या देहाचा त्याग करून आपापल्या कर्माप्रमाणें व ज्ञाना[1]प्रमाणें प्राप्त होतात.

**ये के चात्महनः । आत्मानं घ्नन्तीत्यात्महनः । के ते जनाः येऽविद्वांसः । कथं त आत्मानं नित्यं हिंसन्ति । अविद्यादोषेण विद्यमानस्यात्मनस्तिरस्करणात् । विद्यमानस्यात्मनो यत्कार्यं फलमजरामरत्वादिसंवेदनलक्षणं तद्धतस्येव तिरोभूतं भवतीति प्राकृताविद्वांसो जना आत्महन उच्यन्ते । तेन ह्यात्महननदोषेण संसरन्ति ते ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ—'ये के च आत्महनः-'** जे आत्म्याचाच नाश करितात ते आत्महन. ते कोण तर जे अविद्वान् असतात. पण ते अविद्वान् नित्य आत्म्याची हिंसा कशी करितात ? अविद्यादोषा[2]नें. विद्यमान असलेल्या आत्म्याचाहि तिरस्कार करण्यानें. विद्यमान आत्म्याचें-अजरत्व अमरत्व इत्यादि जाणणें, हें जे कार्य,-फल तें तो मेल्याप्रमाणें लुप्त होतें. यास्तव प्राकृत अविद्वान् जन आत्महन म्हटले जातात आणि त्या आत्महनन-दोषानेंच ते संसार करितात [ जन्म-मरणपरंपरेचा अनुभव घेतात. ] ३.

## अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्षत् ।
## तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति ४

**मन्त्रार्थ—अनेजत्**—तें आत्मतत्त्व आपल्या स्वरूपापासून कधींहि च्युत न होणारें—**एकं**—एक व—**मनसः जवीयः**—मनाहूनहि अधिक वेगवान् आहे.—**देवाः एनत् न आप्नुवन्**—इंद्रियें त्याला प्राप्त झालेलीं नाहींत. कारण—**पूर्वं अर्षत्**—तें सर्वांच्या पूर्वी जेथें तेथें गेलेलें असतें.—**तत् तिष्ठत् धावतः अन्यान् अत्येति**—तें स्वतः एकाच अविक्रियावस्थेंत असूनहि सत्वर गमन करणाऱ्या दुसऱ्या मन-वाणी इत्यादिकांचें उल्लंघन करून जातें.—**तस्मिन् अपः मातरिश्वा दधाति**—तें सद्रूप आत्मतत्त्व विद्यमान असतांनाच क्रियात्मक वायु अग्नि, सूर्य, पर्जन्य इत्यादिकांचीं ज्वलनादि कर्में विभागून देतो. ४

**यस्यात्मनो हननादविद्वांसः संसरन्ति तद्विपर्ययेण विद्वांसो जना मुच्यन्ते ते नात्महनस्तत्कीदृशमात्मतत्त्वमित्युच्यते । अनेजदिति । अनेजत् न एजत् । एजृ कम्पने ।**

---

१ ज्यानें जसें विहित किंवा प्रतिषिद्ध कर्म अथवा उपासना केली असेल त्याच्या अनुरूप योनीसच तो प्राप्त होतो. २ ज्याप्रमाणें एखाद्या पवित्र पुरुषावर मिथ्या आरोप करणें, याला अशस्त्रवध म्हणतात त्याप्रमाणें आत्म्यावर पापित्वादिकांचा अध्यास करणे, ही त्याची हिंसाच आहे. मी अजर-अमरत्वादि लक्षण आहें, असें जाणणें व बोलणें हें कार्य मेलेल्या पुरुषाप्रमाणें त्यांच्या ठिकाणी दिसत नसल्यामुळें हननाचा उपचार केला जातो.

**कंपनं चलनं-स्वावस्थाप्रच्युतिस्तद्वर्जितं सर्वदैकरूपमित्यर्थः । तच्चैकं सर्वभूतेषु । मनसः सङ्कल्पादिलक्षणात् जवीयो जववत्तरम् ॥**

**भाष्यार्थ**—ज्या आत्म्याच्या हननानें अविद्वान् संसार करितात व ज्याचें हनन न केल्यानें विद्वान् जन मुक्त होतात आणि ते आत्महन नव्हेत त्या आत्म्याचें तत्त्व कशा-प्रकारचें आहे, तें श्रुति सांगते—तें 'अनेजत्' म्हणजे न कांपणारें आहे. ' एजृ कम्पने ' असा धातु आहे. त्या एज् म्हणजे कांपणें या धातूचें 'एजत्' हें वर्तमानकालवाचक धातु-साधित आहे. कंपन म्हणजे चलन. आपल्या अवस्थेपासून प्रच्युति–अगदीं च्युत होणें. त्या कंपनानें रहित. सर्वदा एकरूप, असा याचा अर्थ. तसेंच तें सर्व भूतांमध्यें एक. संकल्पात्मक मनाहूनहि अधिक वेगवान् आहे.

**कथं विरुद्धमुच्यते । ध्रुवं निश्चलमिदं मनसो जवीय इति च । नैष दोषः । निरु-पाध्युपाधिमत्त्वेनोपपत्तेः । तत्र निरुपाधिकेन स्वेन रूपेणोच्यते अनेजदेकमिति । मन-सोऽन्तःकरणस्य सङ्कल्पविकल्पलक्षणस्योपाधेरनुवर्त्तनादिह देहस्थस्य मनसो ब्रह्मलो-कादिदूरगमनं सङ्कल्पेन क्षणमात्राद्भवतीत्यतो मनसो जविष्ठत्वं लोके प्रसिद्धम् । तस्मिन्मनसि ब्रह्मलोकादीन्द्रुतं गच्छति सति प्रथमं प्राप्त इवात्मचैतन्यावभासो गृह्यतेऽतो मनसो जवीय इत्याह । नैनद्देवा द्योतनाद्देवाश्चक्षुरादीनीन्द्रियाण्येतत्प्रकृतमात्मतत्त्वं नाप्नुवन्न प्राप्तवन्तः । तेभ्यो मनो जवीयो मनोव्यापारव्यवहितत्वात् । आभासमात्र-मप्यात्मनो नैव देवानां विषयीभवति ॥**

**भाष्यार्थ—वादी**—अहो हें तुम्ही असें विरुद्ध कसें सांगतां ? तें ध्रुव, निश्चल व मनाहूनहि वेगवान्, असें म्हणणें परस्पर विरुद्ध नाहीं का ?

**सिद्धान्ती**—नाहीं. त्यांत कांहीं दोष नाहीं. निरुपाधि व उपाधिमत्त्व यांच्या योगानें त्या विरुद्ध धर्मांचीहि उपपत्ति लागते. त्यांतील निरुपाधिक स्वाभाविक रूपानें त्याला अचल, एक असें म्हटलें आहे व तें मनाचें, संकल्प-विकल्पात्मक अंतःकरणाचें, मनःसंज्ञक उपाधीचें अनुवर्तन करीत असल्यामुळें मनाहूनहि अधिक वेगवालें आहे, असें म्हटलें आहे. येथें–देहामध्यें असलेल्या मनाचें संकल्पानें एका क्षणमात्रांत ब्रह्मलोकादि फार दूर प्रदेशीं गमन होतें. यास्तव त्याचें अतिशय वेगवत्त्व लोकामध्यें प्रसिद्ध आहे. पण तें मन ब्रह्मलोकादिकांस जों सत्वर जात आहे तों आत्मचैतन्यावभास तेथें पूर्वींच जाऊन पोंचलेला आहे, अशी प्रतीति येते. यास्तव तें तत्त्व मनाहून अधिक वेगवत् आहे, असें श्रुति म्हणते. विषयांस प्रकाशित करीत असल्यामुळें इंद्रियेंच देव होत. ते देव या प्रकृत आत्मतत्त्वास प्राप्त होत नाहींत. कारण इंद्रियांहूनहि मन अधिक वेगवान् आहे; आणि इंद्रियें व आत्मा यांच्यामध्यें मनोव्यापार असल्यामुळें आत्म्याचा नुस्ता आभासहि इंद्रियसंज्ञक देवांचा विषय होत नाहीं. ( चक्षुरादि इंद्रियांची प्रवृत्ति मनोव्यापारपूर्वक असल्यामुळें म्हणजे अगोदर मनोव्यापार होईल तेव्हांच पुढें इंद्रि-यांची प्रवृत्ति होणार, असा नियमच असल्यामुळें मनाचाहि विषय न होणारा आत्मा चक्षुरादि इंद्रियांचा विषय होणें संभवत नाहीं. )

**यस्माज्जवनान्मनसोऽपि पूर्वमर्षत् पूर्वमेव गतम् । व्योमवद्व्यापित्वात् । सर्वव्यापि तदात्मतत्त्वं सर्वसंसारधर्मवर्जितं स्वेन निरुपाधिकेन स्वरूपेणाविक्रियमेव सदुपाधिकृताः सर्वाः संसारविक्रिया अनुभवतीवाऽविवेकिनां मूढानामनेकमिव च प्रतिदेहं प्रत्यवभासत इत्येतदाह ॥**

**भाष्यार्थ**—पण मनाचा तरी तो विषय कसा नव्हे ? तें सांगतात–कारण तें आकाशाप्रमाणें व्यापी असल्यामुळें अति वेगवाल्या मनाच्याहि पूर्वींच गेलें आहे. तें सर्वव्यापी व सर्व संसारधर्मवर्जित आत्मतत्त्व आपल्या स्वाभाविक निरुपाधिक स्वरूपानें अविक्रियच असतांना उपाधिकृत सर्व संसारविक्रियांचा जणुं काय अनुभव घेतें व मूढ अविवेक्यांस प्रत्येक देहामध्यें भिन्न आहेसें वाटतें. श्रुति आतां तीच वस्तुस्थिति सांगत आहे.

**तद्धावतो द्रुतं गच्छतोऽन्यानात्मविलक्षणान्मनोवागिन्द्रियप्रभृतीनत्येति अतीत्य गच्छतीव । इवार्थं स्वयमेव दर्शयति । तिष्ठदिति । स्वयमविक्रियमेव सदित्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—तें आत्मतत्त्व धावणाऱ्या, सत्वर गमन करणाऱ्या मन, वाक्-इंद्रिय इत्यादि दुसऱ्या आत्मविलक्षण पदार्थांचे जणुं काय उल्लंघन करून जातें. ' जणुं काय ' असें म्हणून त्याचें उल्लंघन करून जाणें खरें नव्हे, असें जें येथें आम्हीं सुचविलें आहे, तेंच श्रुति स्वतः सांगते–तें स्वतः 'तिष्ठत्' अविक्रियच असतांना अन्यांचें उल्लंघन करते, असा भावार्थ. [ अर्थात् त्याचें उल्लंघन करून जाणें हा भास आहे. ]

**तस्मिन्नात्मतत्त्वे सति नित्यचैतन्यस्वभावे मातरिश्वा मातरि अन्तरिक्षे श्वयति गच्छतीति मातरिश्वा वायुः सर्वप्राणभृत्क्रियात्मको यदाश्रयाणि कार्यकरणजातानि यस्मिन्नोतानि प्रोतानि च यत्सूत्रसंज्ञकं सर्वस्य जगतो विधारयितृ स मातरिश्वा । अपः कर्माणि प्राणिनां चेष्टालक्षणानि । अग्न्यादित्यपर्जन्यादीनां ज्वलनदहनप्रकाशाभिवर्षणादिलक्षणानि दधाति विभजतीत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—तें नित्य चैतन्यस्वभाव आत्मतत्त्व विद्यमान असतांनाच [ तें विद्यमान असतें म्हणूनच ] अंतरिक्षांत संचार करणारा, सर्वांच्या प्राणास धारण करणारा व क्रियात्मक वायु; ज्याच्या आश्रयानें हें कार्य-करणजात [ शरीरेंद्रियसमूह ] आहे, ज्याच्यामध्यें हें सर्व ओतप्रोत आहे, जें सूत्रसंज्ञक तत्त्व सर्व जगाचें विधारक आहे तो मातरिश्वा वायु; प्राण्यांचीं चेष्टारूप कर्में म्हणजे अग्नि, आदित्य, पर्जन्य इत्यादिकांचीं ज्वलन, दहन, प्रकाश, अभिवर्षण इत्यादि रूप कर्में प्रत्येक वस्तूमध्यें वाटून देतो. म्हणजे अग्नीनें जळणें व जाळणें हींच कार्यें करावीं, सूर्यानें प्रकाश करावा, मेघानें वृष्टि करावी, इत्यादि कर्मांचा विभाग करितो, असा भावार्थ.

---

१ मनाच्या स्वरूपांतच होणारा परिणाम किंवा मनस्थ परिमाण मनाचा विषय होऊं शकत नाहीं. कारण त्या मध्यें व्यवधान–अंतर मुळींच नसतें. त्याप्रमाणें आत्माहि सर्वव्यापक असल्यामुळें मनांतहि असतो आणि त्यामुळेंच तो अत्यंत अव्यवहित, म्हणून न मनाचा विषय होत नाहीं.

**धारयतीति वा । "भीषास्माद्वातः पवत" इत्यादिश्रुतिभ्यः । सर्वा हि कार्यकरणादिविक्रिया नित्यचैतन्यात्मस्वरूपे सर्वास्पदभूते सत्येव भवन्तीत्यर्थः ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ—**अथवा तो वायु अग्न्यादिकांचीं कर्मे 'दधाति' ज्याच्या त्याच्यामध्यें धारण करतो. कारण 'याच्या भीतीनेंच वायु वाहतो. ' इत्यादि अर्थाची श्रुति ( तै. भा. अ. २ अ.८ पृ. १५० ) याविषयीं प्रमाण आहे. सारांश सर्व कार्य-करणादिविक्रिया सर्वास्पदभूत नित्य चैतन्यात्मस्वरूप विद्यमान असतें म्हणूनच होतात, असा इत्यर्थ. ( हिरण्यगर्भ जरी ईश्वर असला तरी त्याचा अधिष्ठाता परमात्मा संभवतो. कारण त्याच्यावांचून हिरण्यगर्भाचीहि नियत प्रवृत्ति उपपन्न होत नाही. ) ४

**तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके ।**
**तदन्तरस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ॥ ५ ॥**

**मन्त्रार्थ—तत् एजति**—तें आत्मतत्त्व चळतें.—**तत् न एजति**—पण तेंच चळत नाहीं. ( म्हणजे वस्तुतः तें विभु असल्यामुळें अचल आहे. पण उपाधीमुळें चंचल असल्यासारखें वाटतें )—**तत् दूरे**—तें अविद्वानांच्या दृष्टीनें दूरसें आहे व —**तत् उ अन्तिके**—तेंच विद्वानांच्या अगदीं समीप असतें.—**तत् अस्य सर्वस्य अन्तः**—तें या सर्वांच्या अन्तर्भागीं आहे व—**तत् उ अस्य सर्वस्य बाह्यतः**—तेंच या सर्वांच्या बाह्यतः आहे. ५

**न मन्त्राणां जामिताऽस्तीति पूर्वमन्त्रोक्तमप्यर्थं पुनराह । तदेजतीति । तदात्मतत्त्वं यत्प्रकृतं तदेजति चलति तदेव च नैजति स्वतो नैव चलति स्वतोऽचलमेव सच्चलतीवेत्यर्थः । किञ्च तद्दूरे वर्षकोटिशतैरप्यविदुषामप्राप्यत्वाद्दूर इव । तत् उ अन्तिके इति च्छेदः । तद्वन्तिके समीपेऽत्यन्तमेव विदुषामात्मत्वान्न केवलं दूरेऽन्तिके च । तदन्तरभ्यन्तरेऽस्य सर्वस्य । य आत्मा सर्वान्तर इति श्रुतेः । अस्य सर्वस्य जगतो नामरूपक्रियात्मकस्य तदु अपि सर्वस्यास्य बाह्यतो व्यापकत्वादाकाशवन्निरतिशयसूक्ष्मत्वादन्तः । प्रज्ञानघन एवेति च शासनान्निरन्तरं च ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—**मंत्रांना आळस नाहीं. यास्तव पूर्व मंत्रांत सांगितलेलाहि अर्थ हा मंत्र पुनः सांगतो—' तत् एजति-' ज्याचें वर्णन चाललें आहे तें आत्मतत्त्व चळतें. ' तत् न एजति- ' पण तेंच स्वतः चळतहि नाहीं. तें स्वतः अचल असतांनाहि जणुं काय चळतें, असें भान होतें, असा भावार्थ. तसेंच तें दूर आहे. अविद्वानांना शतकोटी वर्षांनीहि प्राप्त होण्यासारखें नसल्यामुळें तें जसें कांहीं दूरच आहे. ' तत् उ अन्तिके ' असा पदच्छेद. पण तें समीपहि आहे. तें या सर्व दृश्यांच्या अभ्यंतर्भागीं आहे. कारण 'जो सर्वांतर आत्मा' ( बृह. भा. अ. ३ ब्रा. ५ पृ. १२३ ) अशा अर्थाची श्रुति आहे तसेंच तें या सर्व नाम-रूप-क्रियात्मक जगाच्या बाहेरहि आहे. म्हणजे तें आकाशाप्रमाणें व्यापक असल्यामुळें सर्वांच्या बाहेरून असतें व निरतिशय सूक्ष्म असल्यामुळें आंतहि

असतें. ( पण तसें ह्मटल्यास बाहेरून व आंतून असणारें तें मध्यें नसतें, असें होतें व त्यामुळें तें निरंतर एकरस आहे असें होत नाहीं असें कोणी ह्मणेल म्हणून आचार्य सांगतात— ) श्रुतीनें ' प्रज्ञानघन एव, ' असें म्हटलेलें असल्यामुळें तें निरंतरहि आहे. ( म्हणजे आंतून व बाहेरून असून मध्यें नाहीं, असें नाहीं. तर निरंतर आहे. ) ५

## यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ।
## सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥ ६ ॥

**मन्त्रार्थ—यः तु**—जो—**सर्वाणि भूतानि**—सर्व भूतें—**आत्मनि एव अनुपश्यति**—आत्म्यामध्येंच पाहतो—**च सर्वभूतेषु आत्मानं**—व सर्वभूतांमध्यें आत्म्याला पाहतो—**ततः**—तो त्या पाहण्यामुळेंच—**न विजुगुप्सते**—कोणाची घृणा [ निन्दा ] करीत नाहीं. ६.

**यस्तु । यः परिव्राड् मुमुक्षुः सर्वाणि भूतान्यव्यक्तादीनि स्थावरान्तान्यात्मन्येवानुपश्यत्यात्मव्यतिरिक्तानि न पश्यतीत्यर्थः । सर्वभूतेषु च तेष्वेव चात्मानं तेषामपि भूतानां स्वमात्मानमात्मत्वेन यथास्य देहस्य कार्यकरणसङ्घातस्यात्माऽहं सर्वप्रत्ययसाक्षिभूतश्चेतयिता केवलो निर्गुणोऽनेनैव स्वरूपेणाव्यक्तादीनां स्थावरान्तानामहमेवात्मेति सर्वभूतेषु चात्मानं निर्विशेषं यस्त्वनुपश्यति स ततस्तस्मादेव दर्शनान्न विजुगुप्सते विजुगुप्सां घृणां न करोति ॥**

**भाष्यार्थ**—[ विधिनिषेधशून्य जीवन्मुक्तस्वरूपानें राहणें, हें वरील आत्मज्ञानाचें फळ आहे, असें आतां श्रुति सांगते–] जो परिव्राट् मुमुक्षु अव्यक्तादि-स्थावरान्त सर्व भूतें आत्म्यामध्येंच पाहतो; आत्मव्यतिरिक्त–आत्म्याहून पृथक् पहात नाहीं, असा त्याचा इत्यर्थ; व त्याच सर्व भूतांमध्यें आत्म्यास पाहतो; त्या भूतांच्याहि आत्म्याला आपला आत्मा समजतो; जसा मी या देहाचा–कार्य-करणसंघाताचा आत्मा, सर्व प्रत्ययांचा साक्षी, चेतयिता, केवल, व निर्गुण आहें, त्याचप्रमाणें मी याच स्वरूपानें अव्यक्तादि-स्थावरान्त भूतांचा आत्मा आहें, अशा रीतीनें सर्व भूतांच्या ठायीं निर्विशेष आत्म्याला जो पाहतो तो त्या दर्शनामुळेंच कोणाचीहि घृणा [ निंदा, तिरस्कार ] करीत नाहीं.

**प्राप्तस्यैवानुवादोऽयम् । सर्वा हि घृणात्मनोऽन्यद्दुष्टं पश्यतो भवत्यात्मानमेवात्यन्तविशुद्धं निरन्तरं पश्यतो न घृणानिमित्तमर्थान्तरमस्तीति प्राप्तमेव । ततो न विजुगुप्सत इति ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**—हा प्राप्त वस्तुस्थितीचाच अनुवाद आहे. कारण सर्व घृणा आत्म्याहून भिन्न व दूषित वस्तूला पाहणाराकडूनच होते. पण जो अत्यंत विशुद्ध व निरंतर आत्म्यालाच पाहतो त्याच्या दृष्टीनें घृणेचें निमित्त, असा दुसरा पदार्थच नसतो, त्यामुळें कोणाची घृणा न करणें हें प्राप्तच आहे. यास्तव तो जुगुप्सा–निंदा करीत नाहीं. ६.

**यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः ।**
**तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ॥ ७ ॥**

**मन्त्रार्थ—यस्मिन्**—ज्या वेळीं—**विजानतः**—ज्ञानी पुरुषाला—**सर्वाणि भूतानि**—सर्व भूतें—**आत्मा एव अभूत्**—आत्माच झाला—**तत्र**—तेव्हां—**एकत्वं अनुपश्यतः**—त्या एकत्व पाहणाऱ्या विद्वानाला—**कः शोकः कः मोहः**—शोक कशाचा व मोह कशाचा ? ७.

इममेवार्थमन्योऽपि मन्त्र आह । यस्मिन्सर्वाणि भूतानीति । यस्मिन्काले यथोक्तात्मनि वा तान्येव भूतानि सर्वाणि परमार्थात्मदर्शनादात्मैवाभूदात्मैव संवृत्तः परमार्थवस्तु विजानतस्तत्र तस्मिन्काले तत्रात्मनि वा को मोहः कः शोकः । शोकश्च मोहश्च कामकर्मबीजमजानतो भवति । न त्वात्मैकत्वं विशुद्धं गगनोपमं पश्यतः । को मोहः कः शोक इति शोकमोहयोरविद्याकार्ययोराक्षेपेणासंभवप्रदर्शनात् सकारणस्य संसारस्यात्यन्तमेवोच्छेदः प्रदर्शितो भवति ॥ ७ ॥

**भाष्यार्थ**—हाच अर्थ 'यस्मिन्-'इत्यादि दुसराहि मंत्र सांगत आहे.—ज्या काळीं अथवा ज्या पूर्वोक्त आत्म्यामध्ये तींच सर्व भूतें परमार्थ वस्तु जाणणाऱ्या पुरुषाला परमार्थ आत्मदर्शनामुळें आत्माच झालीं त्याकाळीं किंवा त्या आत्म्यामध्यें शोक कसला व मोह कसला ? जो काम व कर्म यांच्या बीजाला जाणत नाहीं, त्यालाच शोक व मोह होतो. पण जो विशुद्ध गगनतुल्य आत्मैकत्व पाहतो त्याला शोक व मोह होत नाहीं. 'त्यावेळीं शोक कसला व मोह कसला ?' असें म्हणून अविद्येचीं कार्यें, अशा शोक-मोहांविषयीं आक्षेप[1] करून त्यांचा असंभव श्रुतीनें प्रदर्शित केला आहे. त्यावरून कारणासह सर्व संसाराचा अत्यंत उच्छेदच प्रदर्शित होतो. ( निरतिशय आनंदस्वरूप व त्यामुळेंच ज्याला दुःखाचा नुस्ता स्पर्शहि झालेला नाहीं अशा आत्म्याला न जाणणाऱ्या जीवालाच 'हाय हाय, मी मेलों, मला पुत्र नाहीं, मला क्षेत्र नाहीं, ' असा शोक होतो. त्यानंतर तो पुत्रादिकांची कामना करतो. त्यांकरितां देवतांचें आराधन इत्यादि करण्याची इच्छा करतो. पण ज्याला आत्म्याच्या एकत्वाचें ज्ञान झालें आहे त्याला असा शोकमोह होत असल्याचें दिसत नाहीं. याच अन्वय-व्यतिरेकावरून शोकादिक अविद्येचें कार्य आहे, असा निश्चय होतो आणि त्यामुळें मूल अविद्येची निवृत्ति झाल्यानेंच शोकादिकांची आत्यंतिक निवृत्ति होते. तेंच विद्येचें फल आहे. कारण अविद्येचा नुस्ता लय सुषुप्तींतहि होतो, असा याचा भावार्थ. ) ७.

---

१ ज्याचें उत्तर अध्याहृत असतें, त्या प्रश्नाला आक्षेप म्हणतात. जसें—अहो तो एवढा पवित्र ब्राह्मण खोटें बोलेल कीं काय ?

# स पर्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविरꣳ शुद्धमपापविद्धम् । कविर्मनीषी परिभूः स्वयम्भूर्याथातथ्यतोऽर्थान्व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥ ८ ॥

**मन्त्रार्थ—सः पर्यगात्**—तो आत्मा सभोंवार पसरलेला आहे.—**शुक्रं**—जो शुद्ध,—**अकायं**—लिंगशरीररहित,—**अव्रणं**—अक्षत व—**अस्नाविरं**—शिरांनी रहित [ म्हणजे स्थूल शरीरशून्य ], —**शुद्धं**—अविद्यामलरहित,—**अपापविद्धं**—धर्माधर्मादि पापरहित,—**कविः**—सर्वद्रष्टा—**मनीषी**—सर्वज्ञ—**परिभूः**—सर्वांहून श्रेष्ठ असणारा व—**स्वयंभूः**—स्वयंभू आहे, तो नित्यमुक्त ईश्वर—**याथातथ्यतः**—अगदीं जसें पाहिजे तसें म्हणजे कर्म, फल व साधन यांच्या अनुसार—**शाश्वतीभ्यः समाभ्यःअर्थान् व्यदधात्**—नित्य प्रजापतींना कर्तव्यांचा विभाग करून देता झाला.

**योऽयमतीतैर्मन्त्रैरुक्त आत्मा स स्वेन रूपेण किंलक्षण इत्याहायं मन्त्रः । स पर्यगात्स यथोक्त आत्मा पर्यगात्परि समन्तादगाद्गतवानाकाशवद्व्यापीत्यर्थः । शुक्रं शुद्धं ज्योतिष्मद्दीप्तिमानित्यर्थः । अकायमशरीरो लिङ्गशरीरवर्जित इत्यर्थः । अव्रणमक्षतं । अस्नाविरं स्नावाः शिरा यस्मिन्न विद्यन्त इत्यस्नाविरं । अव्रणमस्नाविरमित्याभ्यां स्थूलशरीरप्रतिषेधः । शुद्धं निर्मलमविद्यामलरहितमिति कारणशरीरप्रतिषेधः । अपापविद्धं धर्माधर्मादिपापवर्जितम् । शुक्रमित्यादीनि वचांसि पुल्लिंगत्वेन परिणेयाणि । स पर्यगादित्युपक्रम्य कविर्मनीषीत्यादिना पुल्लिंगत्वेनोपसंहारात् । कविः क्रान्तदर्शी सर्वदृक् । नान्योऽतोऽस्ति द्रष्टेत्यादिश्रुतेः । मनीषी मनस ईषिता सर्वज्ञ ईश्वर इत्यर्थः । परिभूः सर्वेषां पर्युपरि भवतीति परिभूः । स्वयम्भूः । स्वयमेव भवतीति ॥**

**भाष्यार्थ**—हा जो वरील मंत्रांनीं सांगितलेला आत्मा त्याचें स्वभावतः काय लक्षण आहे, हें हा मंत्र सांगत आहे.—तो पूर्वोक्त आत्मा परि–समंतात् भागीं गेलेला आहे. तो आकाशासारखा व्यापी आहे, असा याचा अर्थ. तसाच तो 'शुक्र' म्हणजे शुद्ध–ज्योतिःस्वरूप–दीप्तिमान् आहे. तो ' अकाय ' म्हणजे–अशरीर लिंगशरीररहित, असा याचा इत्यर्थ. तो 'अव्रण' म्हणजे अक्षत आहे.तशाच त्याच्या स्वरूपांत 'स्नावा' म्हणजे शिरा नसतात. श्रुतीनें 'अव्रण' व 'अस्नाविर' या दोन विशेषणांनीं स्थूल शरीराचा प्रतिषेध केला आहे. शुद्ध म्हणजे निर्मल, अविद्यामलरहित; या विशेषणानें कारण शरीराचा निषेध केला आहे. अपापविद्ध म्हणजे धर्माधर्मादि पापरहित. या श्रुतींत शुक्रं, अकायं, अव्रणं, अस्नाविरं, शुद्धं व अपापविद्धं, अशीं नपुंसकलिंगी वचनें जरी असलीं तरी तीं पुल्लिंगी करून घ्यावीं. कारण त्या श्रुतीनें 'स पर्यगात्०' असा 'सः' या पुल्लिंगी पदानें उपक्रम [ आरंभ ] करून 'कविः, मनीषी०' इत्यादि पुल्लिंगी पदांनींच उपसंहार [ समाप्ति ] केला आहे. ( यास्तव मधलीं पदेंहि पुल्लिंगी आहेत, असें समजणेंच उचित होय. ] असो; कवि म्हणजे क्रान्तदर्शी, क्रान्त म्हणजे होऊन गेलेलें, नष्ट झालेलें,

त्याला पाहणारा ( पण 'क्रान्त' हें पद उदाहरणार्थ असल्यामुळें भूत, भविष्यत् व वर्तमानदर्शी असें जाणावें, अशा आशयानें भाष्यकार म्हणतात-) क्रान्तदर्शी म्हणजे सर्वदृक्. कारण 'याच्याहून अन्य कोणी द्रष्टा नाही,' (बृह. भा.अ.३ ब्रा. ८ पृ. २११) अशा अर्थाची श्रुति आहे. 'मनीषी' म्हणजे मनाचा ईषिता सर्वज्ञ, ईश्वर असा याचा अर्थ. 'परिभू' म्हणजे सर्वांच्या वर असणारा. तसाच 'स्वयंभू' म्हणजे स्वतःच होणारा.

**येषामुपरि भवति यश्चोपरि भवति स सर्वः स्वयमेव भवतीति स्वयम्भूः । स नित्यमुक्त ईश्वरो याथातथ्यतः सर्वज्ञत्वाद्यथातथाभावो याथातथ्यं तस्माद्यथाभूतकर्मफलसाधनतोऽर्थान्कर्त्तव्यपदार्थान्व्यदधाद्विहितवान्यथानुरूपं व्यभजदित्यर्थः । शाश्वतीभ्यो नित्याभ्यः समाभ्यः संवत्सराख्येभ्यः प्रजापतिभ्य इत्यर्थः ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ**—अर्थात् ज्यांच्यावरती असतो व जो वर असतो, तो सर्व स्वतःच होतो, म्हणून स्वयंभू. असा तो नित्यमुक्त ईश्वर सर्वज्ञ असल्यामुळें ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें, ज्याचें,जशा प्रकारचें कर्म, फल व साधन होतें, तशा प्रकारें कर्तव्य पदार्थांचें विधान करता झाला, शाश्वत समांतील [ सवत्सरांतील ] ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें ज्याला त्याला कर्तव्यें वाटून देता झाला. संवत्सरसंज्ञक प्रजापतींना त्यानें त्यांचीं कर्तव्यें वाटून दिलीं, असा याचा इत्यर्थ. ८

## अन्धन्तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते ।
## ततो भूय इव ते तमो य उ विद्यायाᳪरताः ॥ ९ ॥

**मन्त्रार्थ—ये अविद्यां उपासते ते अन्धं तमः प्रविशन्ति**—जे कर्मामध्यें रत असतात ते अविद्येमध्यें प्रवेश करितात.—**ये उ विद्यायां रताः ते ततः अपि भूयः इव तमः**—पण जे कर्म सोडून नुसत्या विद्येमध्यें म्हणजे उपासनेमध्यें रत असतात ते त्याहूनहि अधिक अविद्येंत प्रवेश करितात. ९.

**अत्राद्येन मन्त्रेण सर्वैषणापरित्यागेन ज्ञाननिष्ठोक्ता प्रथमो वेदार्थः । 'ईशा वास्यमिदं सर्वं मा गृधः कस्य स्विद्धनम्' इति । अज्ञानां जिजीविषूणां ज्ञाननिष्ठासंभवे 'कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेत्' इति कर्मनिष्ठोक्ता द्वितीयो वेदार्थः ॥**

**भाष्यार्थ**—या उपनिषदांत 'ईशा वास्यमिदं सर्वं...मा गृधः कस्यस्विद्धनं' या आद्य मंत्रानें सर्व-एषणात्यागपूर्वक ज्ञाननिष्ठा सांगितली. तोच प्रथम वेदार्थ आहे. पण जिवंत राहण्याची इच्छा करणाऱ्या अज्ञांच्या ज्ञाननिष्ठेचा असंभव असल्यामुळें 'कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेत्॰ ' या मंत्रानें कर्मनिष्ठा सांगितली. तो दुसरा वेदार्थ होय. ( अर्थात् वेदाचे-ज्ञान व कर्म असे-दोन अर्थ आहेत, व त्या दोन अर्थांचेंच या दोन मंत्रांत प्रतिपादन केलें आहे. परंतु त्याविषयीं भास्कर म्हणतोः-सर्व उपनिषद् हें एक ब्रह्मविद्याप्रकरण आहे. यास्तव त्यांत असा प्रकरणभेद करणें उचित नव्हे. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण प्राणादिकांच्या उपासनेचें निराळें फळ सांगितलेलें आहे. पण अंगाचें पृथक्

फळ कोठेंहि श्रुत नसतें. शिवाय भास्करालाहि येथील व्याकृत-उपासना व अव्याकृत-उपासना यांच्या समुच्चयाचें विधान हें भिन्न प्रकरण म्हणून मान्य आहे. यास्तव कर्मकांडांत भिन्नाधिकारामुळें अग्निहोत्रादि प्रकरण भिन्नच जसें मानलेलें असतें त्याप्रमाणें अधिकारत्वामुळेंच कर्मांच्या अविरुद्ध असलेली विद्या व त्यांच्या विरुद्ध असलेली विद्या यांचीं दोन भिन्न प्रकरणें मानण्यांत कांहीं हानि नाहीं. )

**अनयोश्च निष्ठयोर्विभागो मन्त्रप्रदर्शितयोर्बृहदारण्यकेऽपि प्रदर्शितः ' सोऽकामयत जाया मे स्यात्·' इत्यादिना अज्ञस्य कामिनः कर्माणीति 'मन एवास्यात्मा वाग्जाया०' इत्यादि वचनात् अज्ञत्वं कामित्वं च कर्मनिष्ठस्य निश्चितमवगम्यते । तथा च तत्फलं सप्तान्नसर्गस्तेष्वात्मभावेनात्मस्वरूपावस्थानम् ॥**

**भाष्यार्थ**—( आतां भाष्यकार या मंत्रोक्त अर्थाला ब्राह्मणाची संमति आहे, असें दाखवावयास आरंभ करितात.–) मंत्रानें दाखविलेल्या या दोन निष्ठांचा विभाग बृहदारण्याकांतहि 'सोऽकामयत जाया मे स्यात्' इत्यादि वाक्यानें दाखविला आहे. ' त्यानें कामना केली कीं मला भार्या असावी,' अशा अर्थाच्या त्या वाक्यांत अज्ञ कामनावान् पुरुषाकरितांच कर्में आहेत, असें सांगितलें आहे. कारण ' मन हाच याचा आत्मा, वाक् पत्नी' इत्यादि दुसरें वचन आहे. (त्यांत खरी भार्या, पुत्र व वित्त यांची प्राप्ति न झाल्यास मनाला आत्मा, वाणीला भार्या इत्यादि जाणणें हें अज्ञत्वाचेंच चिह्न आहे. ) त्यावरून कर्मनिष्ठ पुरुषाचें अज्ञत्व व कामित्व यांचें निश्चयानें ज्ञान होतें. त्याचप्रमाणें त्याचें फळ सप्तान्नसर्ग आहे. ( व्रीहि-यवादि हें मनुष्याचें अन्न, हुत व प्रहुत म्हणजे दर्श-पौर्णमास हीं दोन देवांचीं, मन, वाणी व प्राण हीं तीन आत्म्याचीं भोगसाधनें, व पशूकरितां दूध, अशा सात अन्नांची सृष्टि हें कर्माचेंच फल आहे. ) त्यावर 'हें मी व हें माझें,' असा अभिमान ठेवून राहणें हाच संसार आहे. [ अर्थात् संसारप्राप्ति हेंच कर्मांचें फल होय. ]

**जायाद्येषणात्रयसंन्यासेन चात्मविदां कर्मनिष्ठाप्रातिकूल्येनात्मस्वरूपनिष्ठैव दर्शिता 'किं प्रजया करिष्यामो येषान्नोऽयमात्मायं लोकः'इत्यादिना । ये तु ज्ञाननिष्ठाः संन्यासिनस्तेभ्योऽसुर्या नाम त इत्यादिनाऽविद्वन्निन्दाद्वारेणात्मनो याथात्म्यं स पर्यगादित्येतदन्तैर्मन्त्रैरुपदिष्टम् । ते ह्यत्राधिकृता न कामिन इति । तथा च श्वेताश्वतराणां मन्त्रोपनिषदि । 'अत्याश्रमिभ्यः परमं पवित्रं प्रोवाच सम्यगृषिसङ्घजुष्टं' इत्यादि विभज्योक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—[ याप्रमाणें एक निष्ठा सांगून ] नंतर आत्मवेत्त्यांकरितां, कर्मनिष्ठेच्या विरुद्ध, जायादि तीन एषणांच्या संन्यासानें आत्मस्वरूपनिष्ठाच ' किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्मायं लोकः ' या वाक्यानें सांगितली आहे. त्यांतील जे ज्ञाननिष्ठ संन्यासी त्यांना 'असुर्या नाम ते लोका०: ' या तिसऱ्या मंत्रापासून ' स पर्यगात्०' या आठव्या मंत्राच्या अन्तापर्यंत जे मंत्र आहेत त्यांनीं अविद्वानाच्या निंदेच्या द्वारा आत्म्याचें याथा-

१ ज्या आम्हांला हा आत्मरूप लोक संपादनीय आहे त्यांना प्रजा काय करावयाची आहे?

स्म्य उपदेशिलें आहे. कारण त्यांत त्या संन्याश्यांचाच अधिकार आहे; कामीजनांचा नाहीं. तसेंच श्वेताश्वतरांच्या मंत्रोपनिषदांत 'अत्याश्रमिभ्यः परमं पवित्रं प्रोवाच सम्यगृषिसङ्घजुष्टं' या वचनानें उत्तम आश्रमवानांनाच हें ऋषिसमूहानें चांगल्या प्रकारें सेविलेलें परम पवित्र आत्मैकत्व ज्ञान सांगता झाला, असें पृथक् करून सांगितलें आहे,

ये तु कर्मिणः कर्मनिष्ठाः कर्म कुर्वन्त एव जिजीविषवस्तेभ्य इदमुच्यते । अन्धं तम इत्यादि । कथं पुनरेवमवगम्यते न तु सर्वेषामित्युच्यते । अकामिनः साध्यसाधनभेदोपमर्देन 'यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः । तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः' इति यदात्मैकत्वविज्ञानं ( उक्तं ) तन्न केनचित्कर्मणा ज्ञानान्तरेण वा ह्यमूढः समुच्चिचीषति । इह तु समुच्चिचीषयाऽविद्वदादिनिन्दा क्रियते । तत्र च यस्य येन समुच्चयः संभवति न्यायतः शास्त्रतो वा तदिहोच्यते यद्दैवं वित्तं देवताविषयं ज्ञानं कर्मसंबन्धित्वेनोपन्यस्तं न परमात्मज्ञानम् । विद्यया देवलोक इति पृथक्फलश्रवणात् ॥

**भाष्यार्थ**—पण आतां कर्मे करूनच जिवंत राहण्याची इच्छा करणारे जे कर्मनिष्ठ कर्मी त्यांच्याकरितां 'अन्धंतमः प्रविशन्ति०' इत्यादि हें सांगितलें जात आहे. **वादी**—पण हा मंत्र कर्मनिष्ठांकरितांच सांगत आहे, सर्वांकरितां नव्हे, हें कशावरून बरें ज्ञात होतें ? **सिद्धान्ती**—'यस्मिन्सर्वाणि भूतानि०' या सातव्या मंत्रांत अकामनावानांकरितां साध्य-साधनभेदाचा निरास करून जें आत्मैकत्वविज्ञान सांगितलेलें आहे तें कोणत्याहि [ श्रौत किंवा स्मार्त ] कर्माशीं अथवा अन्य ज्ञानाशीं [ उपासनेशीं ] समुच्चित करण्याची इच्छा कोणताहि अमूढ ( विचारी ) करणार नाहीं. पण 'अन्धंतमः०' या येथील मंत्रांत तर अविद्वानादिकांची निंदा केली आहे. यास्तव न्यायतः किंवा शास्त्रतः ज्या ज्ञानाचा ज्या कर्माशीं समुच्चय संभवतो तेंच सांगितलें जातें, जें दैव वित्त-देवताविषयक ज्ञान ( उपासना ) कीं ज्याचा कर्मसंबंधित्वानें[1] उपन्यास केला आहे, तें ज्ञान येथें घ्यावें, परमात्मज्ञान नव्हे. कारण 'विद्यया देवलोकः' असें म्हणून उपासनेचें देवलोक हें पृथक् फळ सांगितलेलें आहे. ( 'ईशावास्यं०' या मंत्रांत ब्रह्मविद्येचा आरंभ केलेला असल्यामुळें त्या विद्येशीं कर्माचा समुच्चय करण्याकरितां या मंत्रांत केवल कर्मे करणाराची निंदा केली आहे, असें भास्कर म्हणतो. पण तें बरोबर नाहीं. कारण केवल ब्रह्मविद्या प्रस्तुत आहे, एवढ्याचवरून तिचा हवा त्याच्याशीं संबंध लावतां कामा नये. तर ज्याचा ज्याच्याशीं संबंध होणें उचित असेल, त्यांचाच संबंध लावला पाहिजे. शुद्ध ब्रह्मात्मैकत्वविद्या तर कर्तृत्वादिकांचा नाश करीत असते. यास्तव तिच्यामध्यें कर्मसंबंधयोग्यताच संभवत नाहीं. शिवाय ज्याचें अनुष्ठान केल्यावर फळ मिळण्यास कांहीं अवकाश असतो त्याचाच सहकारीशीं समुच्चय संभवतो, पण जेथें एकत्वदर्शन होतांच तत्काळ शोक-मोहनिवृत्ति हें दृष्ट फळ मिळतें तेथें सहकारीचीच आवश्यकता नसल्यामुळें,

---

१ ज्याला हें कर्माशीं संबंध ठेवणारें, म्हणून म्हटलें आहे.

समुच्चयाचीहि इच्छा करणें व्यर्थ आहे. यास्तव कर्माशीं विरुद्ध नसलेल्या देवताज्ञानाचाच कर्मसमुच्चय इष्ट आहे. )

**तयोर्ज्ञानकर्मणोरिहैकैकानुष्ठाननिन्दा समुच्चिचीषया न निन्दापरैव । एकैकस्य पृथक्फलश्रवणात् । विद्यया तदारोहन्ति । विद्यया देवलोकः । न तत्र दक्षिणा यन्ति । कर्मणा पितृलोक इति । न हि शास्त्रविहितं किञ्चिदकर्तव्यतामियात् ॥**

**भाष्यार्थ**—तें देवताज्ञान व कर्म या दोहोंतील एकेकाच्या अनुष्ठानाची निंदा जी येथें केली आहे ती त्यांचा समुच्चय करण्याच्या इच्छेनें केलेली आहे. केवळ निंदाच करावी, म्हणून केलेली नाहीं. कारण केवळ देवताज्ञान व केवळ कर्म यांचें पृथक् फल सांगितलेलें आहे, ' विद्यया तदारोहन्ति, विद्यया देवलोकः, न तत्र दक्षिणा यन्ति, कर्मणा पितृलोकः ' हीं तीं पृथक् फल सांगणारीं श्रुतिवचनें आहेत. [ त्यांचा क्रमानें अर्थ असा –देवताज्ञानानें त्या पदास प्राप्त होतात, विद्येच्या योगानें देवलोक मिळतो, दक्षिण दिशेकडे, दक्षिण मार्गानें जाणारे तेथें जात नाहींत. कर्माच्या योगानें पितृलोक मिळतो. ] शास्त्रानें ज्याचें विधान केलें आहे, असें कांहींहि अकर्तव्य होत नसतें. ( यास्तव शास्त्रविहित केवळ कर्म व केवळ उपासना हीं अकर्तव्यें आहेत, तीं कोणी करूंच नयेत, म्हणून ही येथें निंदा केलेली नाहीं. )

**तत्र अन्धन्तमः अदर्शनात्मकं तमः प्रविशन्ति । के । येऽविद्यां विद्याया अन्याऽविद्या तां कर्मेत्यर्थः । कर्मणो विद्याविरोधित्वात् । तामविद्यामग्निहोत्रादिलक्षणामेव केवलामुपासते तत्पराः सन्तोऽनुतिष्ठन्तीत्यभिप्रायः । ततस्तस्मादन्धात्मकात्तमसो भूय इव बहुतरमेव ते तमः प्रविशन्ती के कर्म हित्वा ये उ ये तु विद्यायामेव देवताज्ञान एव रताः अभिरताः । तत्रावान्तरफलभेदं विद्याकर्मणोः समुच्चयकारणमाह । अन्यथा फलवदफलवतोः सन्निहितयोरङ्गाङ्गितैव स्यादित्यर्थः ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**—( आतां भाष्यकार मंत्राचें व्याख्यान करितात– ) त्यांतील जे अविद्येचें म्हणजे केवळ अग्निहोत्रादिरूप कर्माचेंच उपासन करितात, तत्पर होऊन अनुष्ठान करितात, असा याचा अभिप्राय, ते अदर्शनात्मक तमांत प्रवेश करितात. जी विद्येहून अन्य ती अविद्या म्हणजे कर्म, असा इत्यर्थ. कारण कर्म विद्येच्या विरुद्ध आहे. पण जे कर्म सोडून विद्येमध्यें म्हणजे देवताज्ञानांतच सर्व प्रकारें रत असतात ते त्या पूर्वोक्त अदर्शनात्मक तमाहूनहि अधिकच तमांत प्रवेश करितात. विद्या व कर्म यांचें अवांतर फल निरनिराळें असणें हेंच विद्या व कर्म यांच्या समुच्चयाचें कारण आहे. कारण त्यांचें अवांतर फल जर पृथक् नसतें तर समीप असलेलें एक फलयुक्त व दुसरें फलरहित अनुष्ठान, यांतील एक अंग व दुसरें अंगी झालें असतें. [ म्हणजे त्यांतील एक गौण व दुसरें मुख्य असा विभाग होऊन दोन्ही मिळून तें एकच अनुष्ठान झालें असतें,असा याचा भावार्थ. ]

## अन्यदेवाहुर्विद्ययाऽन्यदाहुरविद्यया ।
## इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥ १० ॥

**मन्त्रार्थ—विद्यया अन्यदेव आहुः**—उपासनेच्या योगानें निराळेंच फल मिळतें असें ह्मणतात व—**अविद्यया अन्यद् एव आहुः**—कर्माच्या योगानें निराळेंच फल मिळतें, असें सांगतात,—**इति ये नः तत् विचचक्षिरे तेषां धीराणां शुश्रुम**—असें आम्हीं ज्या आचार्यांनीं आम्हांला कर्म व देवताज्ञान यांचें व्याख्यान करून सांगितलें त्या बुद्धिमानांच्या तोंडून ऐकलें आहे. १०.

**अन्यदेवेत्यादि । अन्यत्पृथगेव विद्यया क्रियते फलमित्याहुर्वदन्ति विद्यया देवलोकः विद्यया तदारोहन्तीतिश्रुतेः । अन्यदाहुरविद्यया कर्मणा क्रियते । कर्मणा पितृलोक इति श्रुतेः । इत्येवं शुश्रुम श्रुतवन्तो वयं धीराणां धीमतां वचनम् । ये आचार्या नोऽस्मभ्यं तत्कर्म च ज्ञानं च विचचक्षिरे व्याख्यातवन्तस्तेषामयमागमः पारम्पर्यागत इत्यर्थः ॥ १० ॥**

**भाष्यार्थ**—‘ अन्यदेव० ’ याचें व्याख्यान—विद्येकडून निराळेंच फळ केलें जातें, असें ‘ विद्यया देवलोकः, विद्यया तदारोहन्ति,’ अशी श्रुति असल्यामुळें वेदवेत्ते सांगतात. याचप्रमाणें ‘ कर्मणा पितृलोकः ’ अशी श्रुति असल्यामुळें अविद्येकडून–कर्माकडून –निराळेंच फल केलें जातें, असेंहि ते सांगतात, अशा प्रकारचें बुद्धिमानांचें वचन आम्हीं ऐकलें आहे. ज्या आचार्यांनीं आम्हांला कर्म व ज्ञान यांचें व्याख्यान करून सांगितलें त्यांचा हा परंपराभावानें प्राप्त झालेला आगम आहे, असा याचा इत्यर्थ. १०.

विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयꣳ सह ।
अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ॥ ११ ॥

**मन्त्रार्थ**—ज्याअर्थी असें आहे, त्याअर्थी—**विद्यां च अविद्यां च तत् उभयं सह यः वेद**—विद्या व अविद्या म्हणजे देवताज्ञान व कर्म यांना सह अनुष्ठेय म्हणजे एकाच पुरुषाकडून एकाच वेळीं अनुष्ठान केलें जाण्यास योग्य, असें जो जाणतो तो—**अविद्यया मृत्युं तीर्त्वा**—अगोदर कर्माच्या योगानें स्वाभाविक कर्म व ज्ञान यांचें उल्लंघन करून—**विद्यया अमृतं अश्नुते**—देवताज्ञानानें अमृतभावास म्हणजे देवतारूपास प्राप्त होतो. ११

**यत एवमतः विद्यां चाविद्यां च देवताज्ञानं कर्म चेत्यर्थः । यस्तदेतदुभयं सहैकेन पुरुषेणानुष्ठेयं वेद तस्यैवं समुच्चयकारिण एव एकपुरुषार्थसंबन्धः क्रमेण स्यादित्युच्यते। अविद्यया कर्मणा अग्निहोत्रादिना मृत्युं स्वाभाविकं कर्म ज्ञानं च मृत्युशब्दवाच्यमुभयं तीर्त्वातिक्रम्य विद्यया देवताज्ञानेनामृतं देवतात्मभावमश्नुते प्राप्नोति । तद्ध्यमृतमुच्यते यद्देवतात्मगमनम् ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ**—ज्या अर्थी असें आहे त्याअर्थी विद्या व अविद्या म्हणजे देवताज्ञान [ उपासना ] व कर्म, असा इत्यर्थ; हीं दोन्हीं एकाच वेळीं एकाच पुरुषाकडून अनुष्ठेय आहेत, असें जो जाणतो त्या अशारीतीनें समुच्चयकरणाराचाच क्रमानें एका पुरुषार्थाशीं

संबंध होतो, असें आतां श्रुति सांगते—अविद्येच्या म्हणजे अग्निहोत्रादि कर्मांच्या योगानें मृत्यूला तरून, मृत्युशब्दानें सांगण्यास योग्य असलेलें स्वाभाविक कर्म व ज्ञान या उभयतांचें अतिक्रमण करून विद्येच्या योगानें म्हणजे देवताज्ञानानें पुरुष अमृतास म्हणजे देवतात्मभावास प्राप्त होतो. देवताभावास, देवतारूपत्वास प्राप्त होणें हेंच अमृत म्हटलें जातें. ११

## अन्धं तमः प्रविशन्ति येऽसंभूतिमुपासते ।
## ततो भूय इव ते तमो य उ संभूत्यां रताः ॥१२॥

**मंन्त्रार्थ—ये असंभूतिं उपासते ते अन्धं तमः प्रविशन्ति**—जे प्रकृतीची उपासना करितात ते अविद्याख्य अन्धतमांत प्रवेश करितात आणि—**ये संभूत्यां रताः ते ततः भूयः इव तमः ( प्रविशन्ति )**—जे कार्यब्रह्मामध्यें म्हणजे हिरण्यगर्भामध्यें रत असतात ते त्याहूनहि अधिक अंधतमांत पडतात. १२.

अधुना व्याकृताव्याकृतोपासनयोः समुच्चिचीषया प्रत्येकं निन्दोच्यते । **अन्धं तमः प्रविशन्ति ये असंभूतिं** संभवनं संभूतिः सा यस्य कार्यस्य सा संभूतिः तस्या अन्या असंभूतिः प्रकृतिः कारणमविद्या अव्याकृताख्या तामसंभूतिमव्याकृताख्यां प्रकृतिं कारणमविद्यां कामकर्मबीजभूतामदर्शनात्मिकामुपासते ये ते तदनुरूपमेवान्धं तमोऽदर्शनात्मकं प्रविशन्ति । ततस्तस्मादपि भूयो बहुतरमिव तमः प्रविशन्ति य उ संभूत्यां कार्यब्रह्मणि हिरण्यगर्भाख्ये रताः ॥ १२ ॥

**भाष्यार्थ**—आतां व्याकृत व अव्याकृत यांच्या उपासनांचा समुच्चय करण्याच्या इच्छेनें त्यांतील प्रत्येकाच्या पृथक् उपासनेची निंदा केली जात आहे. जे असंभूतीची उपासना करितात ते अंधतमामध्यें प्रवेश करितात. संभवन ( होणें ) म्हणजे संभूति. ती ज्या कार्याला असते त्यालाहि संभूति म्हणतात. त्या संभूतीहून जी अन्य ती असंभूति म्हणजे प्रकृति. कारण, अव्याकृताख्य अविद्या, काम-कर्म-बीजभूत अदर्शनात्मिका ( माया नांवाची परमेश्वराची चित्तंत्र उपाधि ) तिची जे उपासना करितात ते तदनुरूप अदर्शनात्मक तमांतच प्रवेश करितात. पण जे संभूतींत म्हणजे हिरण्यगर्भसंज्ञक कार्य ब्रह्मामध्यें रत असतात ते त्याहूनहि अधिकतर तमांत प्रवेश करितात. ( येथील असंभूतिशब्दानें माया घ्यावी; ब्रह्म समजूं नये. कारण तें निर्विकार असल्यामुळें, साक्षात् प्रकृति होऊं शकत नाहीं. भास्कराला मान्य असलेल्या परिणामवादाचें आम्ही तत्त्वालोकांत निरसन केलें आहे. सुषुप्तींत सांसारिक दुःखांचा अभाव असल्यामुळें पुरुष त्याची जशी इच्छा करितात त्याप्रमाणें प्रकृतिलयाचीहि त्यांनीं प्रार्थना करणें शक्य आहे. कर्मोपासनेप्रमाणें प्रकृतीच्या उपासनेचेंहि फळ परमेश्वरच देईल. यास्तव ‘ प्रकृति जड असल्यामुळें फळ देऊं शकणार नाहीं, करितां तिची उपासना करणें व्यर्थ आहे,’ हें म्हणणें अयोग्य आहे. ) १२.

**अन्यदेवाहुः संभवादन्यदाहुरसंभवात् ।**
**इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥ १३ ॥**

**मन्त्रार्थ—संभवात् अन्यद् एव आहुः**—कार्यब्रह्माच्या उपासनेनें अन्य फळ मिळतें असें सांगतात व—**असंभवात् अन्यद् आहुः**—अव्याकृताच्या उपासनेनें निराळेंच फळ मिळतें, असें सांगतात—**ये नः तत् विचचक्षिरे ( तेषां ) धीराणां इति शुश्रुम**—ज्यांनीं आम्हांला व्याकृत व अव्याकृत यांच्या उपासनेचें व्याख्यान करून सांगितलें त्या बुद्धिमानांच्या तोंडून आम्हीं असें ऐकलें आहे. १३.

अधुनोभयोरुपासनयोः समुच्चयकारणमवयवफलभेदमाह । अन्यदेवेति । अन्यदेव पृथगेवाहुः फलं संभवात्संभूतेः कार्यब्रह्मोपासनादणिमाद्यैश्वर्यलक्षणं व्याख्यातवन्त इत्यर्थः । तथा चान्यदाहुरसंभवादसंभूतेरव्याकृतादव्याकृतोपासनात् । यदुक्तमन्धन्तमः प्रविशन्तीति प्रकृतिलय इति च पौराणिकैरुच्यत इत्येवं शुश्रुम धीराणां वचनं ये नस्तद्विचचक्षिरे व्याकृताव्याकृतोपासनफलं व्याख्यातवन्त इत्यर्थः ॥ १३ ॥

**भाष्यार्थ**—आतां त्या दोन्हीं उपासनांच्या समुच्चयाचें कारण-त्यांतील प्रत्येक अवयवाचें म्हणजे नुसत्या अव्याकृताच्या उपासनेचें व नुसत्या व्याकृताच्या उपासनेचें -फळ भिन्न असणें, हें आहे. यास्तव आतां तो अवयवफलभेदच सांगतात.-संभूतीच्या म्हणजे कार्यब्रह्माच्या उपासनेपासून प्राप्त होणारें अणिमादि-ऐश्वर्यलक्षण निराळेंच फळ सांगितलें आहे. विद्वानांनीं निराळ्याच फळाचें व्याख्यान केलें आहे, असा याचा इत्यर्थ. त्याचप्रमाणें असंभवापासून-असंभूतीपासून, अव्याकृतापासून म्हणजे अव्याकृतसंज्ञक प्रकृतीच्या उपासनेपासून निराळेंच फळ मिळतें ह्मणून सांगितलें आहे; ज्याविषयीं येथें 'अंधतमः प्रविशन्ति' असें ( वरील मंत्रांतच ) म्हटलें आहे, व ज्याला पौराणिक प्रकृतिलय ह्मणून ह्मणतात ( तेंच अव्याकृतोपासनेचें फळ होय ), ज्यांनीं आह्मांला सांगितलें म्ह० व्याकृत व अव्याकृत यांच्या उपासनांचें फळ व्याख्यान करून सांगितलें असा भावार्थ, त्या बुद्धिमानांचें अशा प्रकारचें वचन आह्मीं ऐकलें आहे. १३

**संभूतिं च विनाशं च यस्तद्वेदोभयꣳ सह ।**
**विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्यामृतमश्नुते ॥ १४ ॥**

**मन्त्रार्थ—असंभूतिं च विनाशं च तत् उभयं सह यः वेद**—कारण व कार्यब्रह्म या दोघांची उपासना एकाच वेळीं जो करतो तो—**विनाशेन मृत्युं तीर्त्वा**—कार्यब्रह्माच्या उपासनेनें अनैश्वर्याचें-अधर्म-कामादि दोषजाताचें उल्लंघन करून ( म्हणजे अणिमा, लघिमा इत्यादि ऐश्वर्यास प्राप्त होऊन )—**असंभूत्या अमृतं अश्नुते**—कारणब्रह्माच्या उपासनेनें प्रकृतिलयरूप मोक्षास प्राप्त होतो. १४

**यत एवमतः समुच्चयः संभूत्यसंभूत्युपासनयोर्युक्त एवैकपुरुषार्थत्वाच्चेत्याह । संभूतिं च विनाशं च यस्तद्वेदोभयꣳ सह विनाशो धर्मो यस्य कार्यस्य स तेन धर्मिणाऽभेदेनोच्यते विनाश इति । तेन तदु पासनेनानैश्वर्यमधर्मकामादिदोषजातं च मृत्युं तीर्त्वा हिरण्यगर्भोपासनेन ह्यणिमादि प्राप्तिः फलम् । तेनानैश्वर्यादिमृत्युमतीत्यासंभूत्या अव्याकृतोपासनया अमृतं प्रकृतिलयलक्षणमश्नुते । संभूतिं च विनाशं चेत्यत्रावर्णलोपेन निर्देशो द्रष्टव्यः । प्रकृतिलयफल श्रुत्यनुरोधात् ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ**—ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी संभूति व असंभूति यांच्या उपासनांचा समुच्चय युक्तच आहे. शिवाय त्यांना एकपुरुषार्थत्व असल्यामुळेंहि [ म्हणजे एक पुरुषार्थ हा त्या दोघांचा धर्म असल्यामुळेंहि ] समुच्चय युक्त आहे, असें श्रुति सांगते.– संभूति व विनाश या दोघांच्याहि उपासनांचें सह अनुष्ठान झालें पाहिजे, असें जो जाणतो तो विनाशानें–विनाश हा ज्या कार्याचा धर्म आहे त्या धर्मी कार्याशीं ऐक्य मानून येथें विनाश या धर्माचाच उल्लेख केला आहे. अर्थात् विनाशानें–कार्य ब्रह्माच्या उपासनेनें अनैश्वर्य व अधर्म, काम इत्यादि दोषजात, याच मृत्यूला तरून, त्याचें उल्लंघन करून, हिरण्यगर्भाच्या उपासनेनें अणिमादिकांची प्राप्ति हें फल मिळत असतें, हें प्रसिद्धच आहे. यास्तव त्या कार्य ब्रह्माच्या उपासनेनें अनैश्वर्यादिलक्षण मृत्यूचें उल्लंघन करून, असंभूतीच्या–अव्याकृताच्या–कारण ब्रह्माच्या उपासनेनें उपासक प्रकृतिलयलक्षण अमृतास प्राप्त होतो. या मंत्राचा ‘ संभूतिं च विनाशं च ’ असा पाठ आहे. पण प्रकृतिलयरूप अमृत हें फळ सांगितलेलें असल्यामुळें त्याच्या अनुरोधानें तेथें ‘ असंभूतिं ’ असा शब्द असणें उचित आहे. यास्तव मंत्रांत अकाराचा लोप करून निर्देश केला आहे, असें समजावें. १४.

## हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।
## तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥ १५ ॥

**मन्त्रार्थ—हिरण्मयेन पात्रेण सत्यस्य मुखं अपिहितं**—ज्योतिर्मय [तेजस्वी] पात्राच्या योगानें आदित्यमंडलस्थ ब्रह्माचें मुख–द्वार झांकलेलें आहे.—**पूषन् त्वं सत्यधर्माय दृष्टये तत् अपावृणु**—हे पूषन् , तूं सत्यधर्मा जो मी त्या मला तुझ्या सत्य आत्म्याची उपलब्धि व्हावी ह्मणून तें उघड. १५.

**मानुषदैववित्तसाध्यं फलं शास्त्रलक्षणं प्रकृतिलयान्तम् । एतावती संसारगतिः । अतःपरं पूर्वोक्तमात्मैवाभूद्विजानत इति सर्वात्मभाव एव सर्वैषणासंन्यासज्ञाननिष्ठाफलम् । एवं द्विप्रकारः प्रवृत्तिनिवृत्तिलक्षणो वेदार्थोऽत्र प्रकाशितः । तत्र प्रवृत्तिलक्षणस्य वेदार्थस्य विधिप्रतिषेधलक्षणस्य कृत्स्नस्य प्रकाशने प्रवर्ग्यान्तं ब्राह्मणमुपयुक्तम् । निवृत्तिलक्षणस्य वेदार्थस्य प्रकाशनेऽत ऊर्ध्वं बृहदारण्यकमुपयुक्तं ॥**

**भाष्यार्थ**—( एवढा वेळ विस्तरपूर्वक, सांगितलेला सर्व अर्थ संक्षेपतः सांगून उपसंहार करितात–) शास्त्रानें सांगितलेलें प्रकृतिलयापर्यंत जें सर्व फळ तें,शरीराचें पटुत्व

व गायी, भूमि, सुवर्ण इत्यादिकांची संपात्ति हें मानुषवित्त व देवताज्ञान हें दैववित्त यांच्या योगानें साध्य होणारें आहे. संसारगति काय ती एवढीच. त्याच्यापुढें पूर्वी ' आत्मैवाभूद्विजानतः ' ( मंत्र ७ ) या वचनानें सांगितलेलें सर्वात्मभाव, हेंच सर्व-एषणासंन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठेचें फळ आहे. याप्रमाणें प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण असा दोन प्रकारचा वेदार्थ येथें प्रकाशित केला आहे, त्यांतील विधि-निषेधात्मक प्रवृत्तिलक्षण सर्व वेदार्थाचें प्रकाशन करण्यांत प्रवर्ग्यपर्यंत ब्राह्मणभागाचा उपयोग केला आहे. प्रवर्ग्य ब्राह्मणाच्या पुढें निवृत्तिलक्षण वेदार्थाचें प्रकाशन करण्यांत बृहदारण्यकाचा उपयोग केला आहे.

**तत्र निषेकादिश्मशानान्तं कर्म कुर्वन् जिजीविषेद्यो विद्यया सहापरब्रह्मविषयया तदुक्तं ' विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयꣳसह । अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुत ' इति ॥**

**भाष्यार्थ**—त्यांतील जो पुरुष गर्भाधानसंस्कारापासून अंत्येष्टि कर्मापर्यंत सर्व कर्मे करीतच जिवंत राहण्याची इच्छा करीत असेल त्यानें अपर ब्रह्मविषयक विद्येसह ( उपासनेसहवर्तमानच ) जिवंत राहण्याची इच्छा करावी. कारण त्याविषयीं श्रुतीनें ' विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयं सह । अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते ॥ ' ( पृ. पहा ) असें म्हटलें आहे.

**तत्र केन मार्गेणामृतत्वमश्नुत इत्युच्यते । तद्यत्तत्सत्यमसौ स आदित्यो य एष एतस्मिन्मण्डले पुरुषो यश्चायं दक्षिणेऽक्षन्पुरुष एतदुभयꣳ सत्यं ब्रह्मोपासीनो यथोक्तकर्मकृच्च यः सोऽन्तकाले प्राप्ते सत्यात्मानमात्मनः प्राप्तिद्वारं याचते 'हिरण्मयेन पात्रेण०'इति ॥**

**भाष्यार्थ**—पण तें अमृतत्व ( देवतात्मत्व ) कोणत्या मार्गानें प्राप्त होतें, तें येथें श्रुति सांगते-तें जें सत्य ( तत्त्व ) तोच हा आदित्य, हा जो या मंडलांत पुरुष आहे व हा जो या उजव्या नेत्रांत पुरुष आहे, तें दोन्ही सत्य आहे. जो ब्रह्मोपासक व वेदोक्त कर्म करणारा असतो तो अन्तकाल समीप आला असतां आत्म्यालाच आत्म्याच्या प्राप्तीचें द्वार 'हिरण्मयेन पात्रेण०' या मंत्रानें मागतो. ( म्हणजे तो आत्म्यापाशीं त्याच्या प्राप्तीच्या द्वाराची याचना करतो, असें म्हणून ब्राह्मणांत 'हिरण्मयेन पात्रेण०' या मंत्राचा विनियोग केला आहे. )

**हिरण्मयमिव हिरण्मयं ज्योतिर्मयमित्येतत् । तेन पात्रेणेवापिधानभूतेन सत्यस्यैवादित्यमण्डलस्थस्य ब्रह्मणोऽपिहितमाच्छादितं मुखं द्वारं । तत्त्वं हे पूषन्नपावृणवपसारय सत्यस्योपासनात्सत्यं धर्मो यस्य मम सोऽहं सत्यधर्मा तस्मै मह्यमथवा यथाभूतस्य धर्मस्यानुष्ठात्रे दृष्टये तव सत्यात्मन उपलब्धये ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ**—आतां भाष्यकार त्या मंत्राचें व्याख्यान करितात.–' हिरण्मयेन '–जणुं काय सोन्याच्या, म्हणजे ज्योतिर्मय ( तेजस्वी ) असा याचा अर्थ. अशा हिरण्मय आच्छादनभूत पात्रानें सत्याचें म्हणजे आदित्यमंडलस्थ ब्रह्माचें मुख-द्वार आच्छादित

केलेलें आहे. हे पूषन्, तें पात्र तूं दूर सार. तुज सत्याची उपासना केल्यामुळें सत्य हा ज्याचा धर्म आहे त्या मज सत्यधर्माकरितां तूं तें एकीकडे कर. अथवा यथाभूत म्हणजे सत्य, याच धर्मांचें अनुष्ठान करणाऱ्या मला तुज सत्यात्म्याची उपलब्धि [ साक्षात्कार ] व्हावी म्हणून तें पात्र तूं दूर कर. १५

पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मीन्समूह ।
तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि ॥
योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मि ॥ १६ ॥

**मन्त्रार्थ—पूषन्**—हे जगत्पोषक सूर्या,—**एकर्षे**—हे एकाकी गमन करणाऱ्या एकर्षे,—**यम**—हे नियमन करणाऱ्या यमा,—**सूर्य**—हे प्राण व रस यांचें शोषण करणाऱ्या सूर्या—**प्राजापत्य**—हे प्रजापतिपुत्रा,—**व्यूह रश्मीन् समूह**—तूं आपल्या किरणांना घालीव, एकत्र कर. [ तूं आपल्या संताप देणाऱ्या ज्योतीचा उपसंहार कर. ]—**ते यत् कल्याणतमं रूपं तत् ते पश्यामि**—तुझें जें अत्यंत सुंदर रूप तें मी पाहतों.—**असौ यः असौ पुरुषः सः अहं अस्मि**—हा जो आदित्यमंडलस्थ पुरुष तोच मी आहें.

**पूषन्निति । हे पूषन् । जगतः पोषणात्पूषा रविस्तथैक एव ऋषति गच्छतीत्येकर्षिः । हे एकर्षे । तथा सर्वस्य संयमनाद्यमः । हे यम । तथा रश्मीनां प्राणानां रसानाञ्च स्वीकरणात्सूर्यः । हे सूर्य । प्रजापतेरपत्यम्प्राजापत्यः । हे प्राजापत्य । व्यूह विगमय रश्मीन्स्वान् । समूह एकीकुरु उपसंहर ते तेजस्तापकं ज्योतिः ॥**

**भाष्यार्थ**—हे पूषन्, जगाच्या पोषणामुळें पूषा रवि; त्याचप्रमाणें जो एकटाच जातो तो एकर्षि; हे एकर्षे, सर्वांचें संयमन करीत असल्यामुळें यम; हे यमा, रश्मी [ किरण ], प्राण व रस यांचा स्वीकार करीत असल्यामुळें सूर्य; हे सूर्य, प्रजापतीचें अपत्य म्हणून प्राजापत्य; हे प्राजापत्य, आपल्या रश्मींना दूर कर; आपलें तेज, ताप करणारी ज्योति, एकत्र कर; त्याचा उपसंहार कर.

**यत्ते तव रूपं कल्याणतममत्यन्तशोभनं तत्ते तवात्मनः प्रसादात्पश्यामि । किञ्चाहं न तु त्वां भृत्यवद्याचे योऽसावादित्यमण्डलस्थो व्याहृत्यवयवः पुरुषः पुरुषाकारत्वात्पूर्णं वानेन प्राणबुद्ध्यात्मना जगत्समस्तमिति पुरुषः पुरि शयनाद्वा पुरुषः सोऽहमस्मि भवामि ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ**—तुझें जें कल्याणतम अत्यंत शोभन रूप तें तुज आत्म्याच्या प्रसादानें मी पाहतों. पण मी तुजपाशीं एखाद्या भृत्याप्रमाणें याचना करीत नाहीं. तर जो आदित्यमंडलांतील व्याहृत्यवयव पुरुष तोच मी आहें. तो पुरुषाकार आहे म्हणून पुरुष, किंवा

१ सेवकांप्रमाणें; भिकाऱ्याप्रमाणें; २ ‘ भूः ’ हे ज्याचें शिर आहे, ‘भुवः’ बाहु आहे, ‘सुवर्’ पाद आहे, इत्यादि श्रुतींत म्हटल्याप्रमाणें व्याहृति हेच ज्याचे अवयव आहेत.

यानें प्राण व बुद्धि यांच्या रूपानें सर्व जगत् पूर्ण आहे,व्यापलें आहे म्हणून तो पुरुष अथवा लिंगदेहरूपी पुरींत शयन केल्यामुळें-राहिल्यामुळें तो पुरुष होय. १६.

**वायुरनिलममृतमथेदं भस्मान्तꣳ शरीरम् ।**

**ॐक्रतो स्मर कृतꣳ स्मर क्रतो स्मर कृतꣳ स्मर॥१७॥**

**मन्त्रार्थ—वायुः अनिलं**—आतां मज मरणाऱ्या पुरुषाचा शरीरस्थ वायु सर्वात्मक सूत्रात्म्यास प्राप्त होवो. [ म्हणजे ज्ञान, उपासना व कर्म यांच्यायोगानें संस्कृत झालेलें हें लिंगशरीर स्थूल शरीराला सोडून निघो.]—**अथ इदं शरीरं भस्मान्तं**—नंतर अग्नींत ज्याचा होम केला आहे, असें हें शरीर भस्म होवो—**ओं क्रतो स्मर**—संकल्पात्मक क्रतो आठव.—**कृतं स्मर**—हे क्रतो, मीं जें केलें आहे त्याचें स्मरण कर. माझ्या कृतकर्माचें स्मरण कर. १७.

**वायुरिति । अथेदानीं मम मरिष्यतो वायुः प्राणोऽध्यात्मपरिच्छेदं हित्वाऽधिदैवतात्मानं सर्वात्मकमनिलममृतं सूत्रात्मानं प्रतिपद्यतामिति वाक्यशेषः । लिङ्गं चेदं ज्ञानकर्मसंस्कृतमुत्क्रामत्विति द्रष्टव्यम् । मार्गयाचनसामर्थ्यात् । अथेदं शरीरमग्नौ हुतं भस्मान्तं भूयात् ॥**

**भाष्यार्थ**—आतां मरणाऱ्या माझा वायु म्हणजे प्राण या अध्यात्मपरिच्छेदाचा, शरीरसंबंधी मर्यादेचा,त्याग करून अधिदैवतात्म्यास, सर्वात्मक वायूस, अमृत सूत्रात्म्यास प्राप्त होवो. ( प्राप्त होवो, असें क्रियापद मूळ श्रुतींत नसल्यामुळें भाष्यकारांनीं तें पुढें जोडावें, असें सांगितलें आहे. ) येथें मार्गाची याचना केलेली आहे. त्याच सामर्थ्यानें [ त्याच्या बळावर ] ज्ञान व कर्म यांच्या योगानें संस्कारयुक्त झालेलें हें लिंगशरीर स्थूल शरीरास सोडून जावो, असा याचा भावार्थ जाणावा. वायु गेल्यावर अग्नींत होमिलेलें हें शरीर भस्मान्त होवो. [ त्याचें भस्म होवो. ]

**ओमिति यथोपासनं ॐप्रतीकात्मकत्वात्सत्यात्मकमग्न्याख्यं ब्रह्माभेदेनोच्यते । हे क्रतो सङ्कल्पात्मक स्मर यन्मम स्मर्त्तव्यं तस्य कालोऽयं प्रत्युपस्थितोऽतः स्मर । क्रतो स्मर कृतं स्मरेति पुनर्वचनमादरार्थम् ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ**—‘ ॐक्रतो स्मर कृतं स्मर ’ या मंत्रभागांतील ॐ या वचनानें उपासनानुसार सत्यात्मक अग्निसंज्ञक ब्रह्म ऐक्यरूपानें सांगितलें जात आहे. कारण तें ‘ओं’ प्रतीकात्मक आहे. क्रतो, हे संकल्पात्मका, आठवण कर. माझ्या विषयीं जें कांहीं आठवण करण्यासारखें असेल त्याचा हा काल प्राप्त झाला आहे. यास्तव इतके दिवस मी ज्याची भावना केली होती त्याचें स्मरण कर. त्याचप्रमाणें मी बालपणापासून जें कर्म केलें आहे त्याचें स्मरण कर, या श्रुतींत ‘ क्रतो स्मर कृतं स्मर ’ या पदांचा आदरार्थ पुनः उच्चार केला आहे. १७.

**अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् ।**
**युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम ॥१८॥**

इत्युपनिषद् ॥ इति वाजसनेयसंहितोपनिषत्संपूर्णा ॥
ॐ पूर्णमदः० इति शान्तिः ॥
**ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥**

**मन्त्रार्थ—अग्ने अस्मान् राये सुपथा नय**—हे अग्ने, आम्हांला कर्मफल भोगण्याकरितां सुंदर मार्गानें ने.—**देव विश्वानि वयुनानि विद्वान्**—हे देवा, तूं सर्व कर्में व उपासना जाणणारा आहेस.—**अस्मत् जुहुराणं एनः युयोधि**—आमच्या वंचनात्मक पापाचा नाश कर.—**ते भूयिष्ठां नमउक्तिं विधेम**—आम्हीं तुला अतिशय नमस्कार करतों. [ या वेळीं तुझ्या नमस्कारानेंच तुझी परिचर्या करतों. ] १८

**पुनरन्येन मन्त्रेण मार्गं याचते । अग्ने नयेति । हे अग्ने नय गमय सुपथा शोभनेन मार्गेण । सुपथेति विशेषणं दक्षिणमार्गनिवृत्त्यर्थम् । निर्विण्णोऽहं दक्षिणेन मार्गेण गतागतलक्षणेनातो याचे त्वां पुनः पुनर्गमनागमनवर्जितेन शोभनेन पथा नय । राये धनाय कर्मफलभोगायेत्यर्थः । अस्मान्यथोक्तधर्मफलविशिष्टान्विश्वानि सर्वाणि हे देव वयुनानि कर्माणि प्रज्ञानानि वा विद्वाञ्जानन् । किञ्च युयोधि वियोजय विनाशय अस्मदस्मत्तो जुहुराणं कुटिलं वञ्चनात्मकमेनः पापम् । ततो वयं विशुद्धाः सन्त इष्टं प्राप्स्याम इत्यभिप्रायः । किन्तु वयमिदानीं ते न शक्नुम परिचर्यां कर्तुं भूयिष्ठाम् बहुतराम् । ते तुभ्यं नमउक्तिं नमस्कारवचनं विधेम नमस्कारेण परिचरेम इत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—पुनः दुसऱ्या मंत्रानें मार्गाची याचना करतो. हे अग्ने, मला सुमार्गानें, –सुंदर मार्गानें ने. दक्षिण मार्गाच्या निवृत्तीकरितां 'सुपथा' या पदांत 'सु' हें विशेषण योजलें आहे. गतागतलक्षण म्हणजे जा-ये या स्वरूपाच्या [पुनरावृत्तिरूप] दक्षिणमार्गानें मी आतां अगदीं खिन्न झालों आहें [मला त्या मार्गाचा आतां अगदीं कंटाळा आला आहे.] यास्तव वर सांगितल्याप्रमाणें धर्मफलानें विशिष्ट असलेल्या आम्हांस 'राये' धनाकरितां म्ह० कर्मफलभोगाकरितां असा याचा इत्यर्थ; पुनःपुनः गमनागमनरहित अशा शोभनमार्गानें घेऊन जा, अशी मी तुझी प्रार्थना करीत आहें. हे देव, हे सर्व कर्में किंवा उपासना यांस जाणणाऱ्या, आमच्या वंचनात्मक [ कपटरूप ] पापाचा विनाश कर. म्हणजे आम्ही अतिशय शुद्ध होऊन इष्ट फलास प्राप्त होऊं, असा याचा अभिप्राय. परंतु आतां आम्ही तुझी बरीचशी परिचर्या करण्यास समर्थ नाहीं. यास्तव आम्ही तुला नमस्कारवचन बोलतों. नमस्कारानें तुझी परिचर्या करतों, असा याचा इत्यर्थ. १८

**'अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते । विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्याऽमृतमश्नुत ' इति श्रुत्वा केचित्संशयं कुर्वन्ति । अतस्तन्निराकरणार्थं सङ्क्षेपतो विचारणां करिष्यामः ॥**

**भाष्यार्थ**—(येथवर मंत्रांचें पदशः व्याख्यान करून आतां भाष्यकार संक्षेपतः विचार करण्यास आरंभ करितात–) 'अविद्येच्यायोगानें मृत्यूला तरून विद्येच्यायोगानें अमृतास प्राप्त होतो व विनाशानें मृत्यूला तरून असंभूतीनें अमृतास प्राप्त होतो' असें [ मंत्र ११ व १४ यांच्या उत्तरार्धांत ] ऐकून कांहीं लोक संशय करितात. यास्तव आपण त्यांच्या संशयाचें निराकरण करण्यासाठीं संक्षेपतः विचार करूं या.

**तत्र तावत्किंनिमित्तः संशय इत्युच्यते । विद्याशब्देन मुख्या परमात्मविद्यैव कस्मान्न गृह्यतेऽमृतत्वञ्च । ननूक्तायाः परमात्मविद्यायाः कर्मणश्च विरोधात्समुच्चयानुपपत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—पण तो संशय कोणत्या निमित्तानें येतो, म्हणून विचाराल तर सांगतों. शंका–येथील विद्याशब्दानें मुख्य परमात्मविद्या व अमृतशब्दानें मुख्य अमृतच कां घेत नाहीं ? [ विद्या म्हणजे देवतोपासना व अमृत म्हणजे देवतात्मभाव असा अमुख्य अर्थ कां करितां ? मध्यस्थाचें उत्तर– ] वर सांगितलेल्या परमात्मविद्येचा व कर्माचा विरोध असल्यामुळें त्यांच्या समुच्चयाची [सह अनुष्ठानाची] अनुपपत्ति आहे,म्हणजे सह अनुष्ठान होऊं शकत नाहीं.

**सत्यम् । विरोधस्तु नावगम्यते विरोधाविरोधयोः शास्त्रप्रमाणकत्वात् । यथाऽविद्यानुष्ठानं विद्योपासनञ्च शास्त्रप्रमाणकं तथा तद्विरोधाविरोधावपि । यथा च न हिंस्यात्सर्वा भूतानीति शास्त्रादवगतं पुनः शास्त्रेणैव बाध्यतेऽध्वरे पशुं हिंस्यादिति । एवं विद्याविद्ययोरपि स्यात् । विद्याकर्मणोश्च समुच्चयः ॥**

**भाष्यार्थ**—वादी–तें खरें; पण विरोध व अविरोध या दोघांचेंहि प्रमाण शास्त्रच असल्यामुळें प्रस्तुत स्थळीं विरोध मुळीं अवगतच [ ज्ञातच ] होत नाहीं. ज्याप्रमाणें अविद्येचें अनुष्ठान व विद्येचें उपासन या दोघांचेंहि शास्त्र हेंच एक प्रमाण असतें त्याप्रमाणें त्यांचा विरोध किंवा अविरोध यांचेंहि तेंच प्रमाण होय. जशी ' न हिंस्यात्सर्वा भूतानि ' या शास्त्रावरून अवगत झालेली अहिंसा ' अध्वरे पशुं हिंस्यात् ' या शास्त्रानें पुनः बाधित होते; त्याप्रमाणेंच विद्या व अविद्या यांच्याविषयींहि जाणावें आणि विद्या व कर्म यांचा [ शास्त्रानुसारच ] समुच्चय करावा. [अर्थात् शास्त्रीय ज्ञान व कर्म यांतील विरोध व अविरोधहि शास्त्रीयच घ्यावे. केवळ तर्कानें त्यांचें ग्रहण करूं नये. ]

**न 'दूरमेते विपरीते विषूची अविद्या या च विद्या'इति श्रुतेः । विद्यां चाविद्यां चेतिवचनादविरोध इति चेन्न । हेतुस्वरूपफलविरोधात् । विद्याविद्याविरोधाविरोधयोर्विकल्पासंभवात्समुच्चयविधानादविरोध एवेति चेत् न । सहसंभवानुपपत्तेः । क्रमेणैकाश्रये स्यातां विद्याविद्ये इति चेन्न । विद्योत्पत्तौ अविद्याया ह्यस्तत्वात्तदाश्रयेऽविद्यानुपपत्तेः ॥**

**भाष्यार्थ**—सिद्धान्ती–हें म्हणणें प्रस्तुत प्रसंगीं व्यर्थ आहे.कारण (अविद्या व विद्या यांच्यामधील विरोध शास्त्रसिद्धच आहे)ज्यांच्या गती नाना आहेत अशा या-विद्या व अविद्या अतिशयच विपरीत आहेत, अशी श्रुति आहे, [ म्हणजे स्वतः श्रुतिच त्यांचें विपरीतत्व सांगत आहे.]वादी–पण (काठकोपनिषदांत तुम्ही म्हणतां तसें स्पष्ट सांगितलेलें असल्यामुळें